

नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

७६

# नवभारत

वर्ष १४ वें ] जून १९६१ [ अंक ९



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष चौदावें जून
अंक नववा १९६१

संपादक-मंडळ
आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर
प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९
२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

"नवभारत" मासिकाचा हा अंक ( जून १९६१ ) कांहीं अनपेक्षित व अपरिहार्य अडचणींमुळें नेहमीपेक्षा कितीतरी लहान आकाराचा काढावा लागत आहे. वर्गणीदार व वाचक यांची याबद्दल मनःपूर्वक क्षमा मागतो. जुलै महिन्याचा अंक नेहमीप्रमाणें प्रसिद्ध होईल.

का. सं.

अनुक्रमणिका








श्री. हेमकांत बलकुंदी

# शिक्षणसंस्था व धार्मिक शिक्षण— एक सिंहावलोकन[1]

Where so much is obscure, one thing is at least certain; the interest in religion, an interest which evinces itself in quarters where it might have been least expected, has increased and is increasing. There is a reaction from the indifferentism of the last few years and religion has assumed a place in the forefront of public attention. Religion is news; it is even best selling news.[2] — C. E. M. Joad

खिस्तवासी जोडसाहेबांनी हे उद्गार इंग्लंडमधील धर्मसंस्थेची सद्यःस्थिति व भवितव्य या विषयावर लिहितांना जरी काढले असले तरी ते आपल्या भारतवर्षाच्या सद्यःस्थितीला बऱ्हंशानें लागू पडतात असें म्हणावयास हरकत नाहीं. हिंदुस्थानच्या गेल्या कांही दशकांच्या इतिहासाशीं किंचित्‌हि परिचित असलेल्या व्यक्तीला धर्मभेदांच्या तीव्र स्वरुपामुळें या देशाचा राजकीय प्रश्न किती गुंतागुंतीचा व बिकट झाला होता याची कल्पना सहजच येईल. देशाचें विभाजन व तत्पश्चात् उद्भवलेल्या सांप्रदायिक वा जातीय दंगली याच्यामुळे बहुजनसमाजाचीं मतें धर्मासंबंधी उदासीन व हतोत्साह झालीं. समाजधारणेच्या हेतूने उत्पन्न झालेल्या या सामाजिक संस्थेचे ( Social institution ) हे विपरीत परिणाम पाहून या संस्थेला आजच्या वर्तमान समाजजीवनांत स्थान आहे कीं नाहीं अशी मूलभूत स्वरूपाची शंका सर्वसामान्यांच्याच नव्हे तर अनेक विचारवंतांच्या मनालाहि चाटून गेली असणें अगदीं शक्य आहे. पण स्वातंत्र्योत्तर काळांत अनुभवास आलेल्या विद्यार्थीवर्गांतील बेशिस्तीची अमाप वाढ, सरकारी यंत्रणेंतील अंदाधुंदी व भ्रष्टाचार, राजकीय पक्षांचा स्वार्थीपणा व संधिसाधुपणा, दुधांत पाणी मिसळण्याच्या सर्वमान्य प्रथेपासून तों औषधांच्या व्यापारांतील भेसळीचे भीषण परिणाम अशा बहुविध समाजविघातक घडामोडीमुळे देशांतील लोकमत व सरकारमत "पुनश्च हरि ॐ" म्हणून धर्म व धार्मिक शिक्षण या बाबीकडे वळलेलें दिसतें. याच्या फलस्वरूपी मध्यवर्ती सरकारने तत्कालीन मुंबई राज्याचे राज्यपाल बाबू श्रीप्रकाश यांच्या अध्यक्षतेखाली ऑगस्ट १९५९ मध्ये एक कमेटी नेमली व तिने आपला अहवाल डिसेंबर १९५९ मध्ये सरकारला सादर केला. या अहवालांतील शिफारशींचा विचार करण्यापूर्वी आपण प्राचीन भारतीय शिक्षणपद्धतींतील धर्मशिक्षणाचें स्थान व इंग्रजी राज्यांत शासनसंस्थेनी धर्मशिक्षणासंबंधी घेतलेले विविध निर्णय यांचा धावता आढावा घेणें इष्ट ठरेल.

## प्राचीन भारतांतील धर्मशिक्षण

शीलसंवर्धन, उत्तम गुणपरिपोष व व्यक्तित्व विकसन, स्वकर्तव्यक्षमता व प्राचीन संस्कृति संरक्षण हे चार हिंदु शिक्षणपद्धतीचे उद्देश होते.[3] धर्माचा पगडा हिंदु मनावर फार असतो हें एक निर्विवाद सत्य आहे. त्यामुळे हिंदूंच्या शिक्षणपद्धतीवरहि धर्माची बरीच छाया पडलेली आहे. सर्वसामान्य मानवांच्या आयुष्यांत उद्भवणारे नवागत शिशूच्या नामकरणासारख्या साध्या व वैयक्तिक प्रसंगापासून तों इतर निरनिराळ्या सामाजिक प्रसंगांना उपयोगी पडतील अशा अनेक धार्मिक संस्कारांची हिंदुसमाजानें योजना केलेली आहे. या व अशाच प्रकारच्या बाबी या व्यावहारिक स्वरूपाच्या असून इतर धर्म याकडे फारसें लक्ष देत नाहींत. पण मनुष्यप्राणी हा परमेश्वरास

१. प्रस्तुत लेखकानी लिहिलेल्या प्रबंधाच्या एका प्रकरणाचा हा स्वैर अनुवाद आहे.

२. Dr. C. E. M. Joad, "The present and future of religion." p. 8.

३. "प्राचीन भारतीय शिक्षणपद्धति" डॉ. अळतेकर पान १८०.

कसा चटकन् विसरतो हें हिंदुधर्मप्रवर्तकास पूर्णपणें माहीत असल्यामुळे त्याला परमेश्वराची आठवण वारंवार व्हावी व त्याचें स्मरण त्याने शक्य तितक्या जास्त वेळ कृतज्ञतापूर्वक करावें या हेतूस्तव त्यांनी वैयक्तिक व सामाजिक बाबींनाहि धार्मिक स्वरूप दिलेलें आहे.[४] धर्मसंस्थेचें सर्वंगामित्व व सर्वव्यापीपणा यामुळे प्राचीन भारतांत शारीरिक, नैतिक, बौद्धिक व धार्मिक शिक्षण या शिक्षणपद्धतींतील सध्याच्या घटकेला निरनिराळ्या भासणाऱ्या विषयांकडे तुलनात्मकदृष्ट्या फारसें कोणी लक्ष दिलेलें आढळत नाहीं. या विषयाबद्दल प्राचीन वाङ्मयांत थोडेसे विचार आढळतात पण सोपपत्तिक चर्चा अशी कोठें आढळत नाहीं. अध्यापकांना दिलेलें पूर्ण स्वराज्य हें बहुधा याचें कारण असावें असें डॉ. अळतेकरांचें मत दिसतें.[५] प्राचीनकाळीं धार्मिकता व शुद्ध नैतिकता अशा परस्परनिरपेक्ष स्वतंत्र कल्पनांचा उदय झाला नव्हता व निधर्मी (secular) राज्याचा इतक्या मोठ्या प्रमाणावर प्रयोग झाला नसल्याने धर्मशिक्षण देण्यांत कांहीं व्यवहार्य अडचणी आल्यास निव्वळ नैतिक शिक्षणावर (Moral instruction) भर देऊन समाजधारणेचें कार्य उरकावें अशी विचारप्रणालि कोणी पुढें मांडलेली दिसत नाहीं.

पण याबरोबरच लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट ही कीं युरोपमध्येहि या काळीं धर्माची समाजावर अशीच जबरदस्त पकड होती. वचनप्रामाण्याचें प्रस्थ तेथेहि हिंदुस्थानांइतकेंच माजलेलें होतें. मध्ययुगामध्यें परंपरेने आलेलीं मतें व सिद्धांत शिकवावयाचे हेंच शिक्षणसंस्थांचें ध्येय होतें. स्वतंत्रपणे विचार करून आपल्या बुद्धीस पटतील ते सिद्धांत प्रतिपादण्याची पात्रता विद्यार्थ्यांत यावी अशी मुळीच कोणाचीहि खटपट नव्हती. मठपतींच्याच हातांत अकराव्या शतकापर्यंत शिक्षण राहिल्यामुळें बायबल, धर्मपर कविता व ख्रिस्ती साधूंचीं चरित्रें यांवरच शाळांत भर देण्यांत येई. शिक्षणाचा भर मुख्यत्वेंकरून व्याकरण व वादविवादकौशल्य यावरच असे. विद्यार्थ्यांना निरनिराळ्या ख्रिश्चन सणांच्या तारखांचा हिशेब कळण्याइतपतच गणितशास्त्र शिकविलें जात असे. ऐहिक कार्यक्षमतेवर शिक्षणपद्धतीने जोर दिला पाहिजे; आत्मा, स्वर्ग, नरक, परमेश्वर वगैरे कांहीहि नसले तरी तरुणांना शिक्षण देण्याची आवश्यकता आहे असें प्रथम ल्यूथरने प्रतिपादण्यास युरोपमध्यें सुरुवात केली.[६]

## मुसलमानांच्या आगमनाचा शिक्षणपद्धतीवर परिणाम

भारतांत प्राचीन काळापासून परंपरेनें चालत आलेल्या शिक्षणपद्धतीवर मुसलमानांच्या आगमनाचा परिणाम फार घातक स्वरूपाचा झाला. "मुसलमानी सत्तेचा हिंदु शिक्षणावर फारच भयंकर परिणाम झाला. हिंदूंच्या मालकीच्या बऱ्याच जमिनी गेल्या, राजभाषा बदलली, हिंदुशिक्षणाचे बहुतेक आश्रयदाते नाहीसे झाले. संपन्न हिंदु लोक जेत्यांची भाषा व वाङ्मय शिकूं लागले, संस्कृत शाळामध्यें पुरोहितांचीं मुलें तेवढीं जाऊं लागलीं. उच्च व मध्यम हिंदु वर्गांतील मुलें मुसलमानी शिक्षकांच्या हाताखालीं उर्दू शिकूं लागलीं. त्यामुळें संस्कृत पाठशाळा जवळ जवळ ओस पडून गेल्या."[७] हिंदुस्थानांत ११ व्या शतकांत येऊन ज्याने संस्कृत भाषेचें अध्ययन केलें व तत्कालीन हिंदूंच्या समाजस्थितीबद्दल ज्याने पुस्तक लिहिलेलें आहे त्या अल्बेरुनी नांवाच्या मुसलमानाचेंहि मत असेंच दिसतें. तो म्हणतो, "(राजसत्तेचा आश्रय व प्रोत्साहन नसल्यामुळें) हल्लीचा काळ ज्ञानवृद्धीस अनुकूल नाहीं. हिंदुस्थानांत या वेळीं एखादें नवें शास्त्र उत्पन्न होणें किंवा नवा शोध लागणें ही गोष्ट अशक्य आहे. पूर्वीच्या काळीं जें ज्ञान अवगत होतें त्याचे थोडे अवशेष मात्र शिल्लक राहिलेले दिसतात."[८]

प्राचीन काल व मुसलमानी अमलाच्या काळापर्यंतचा शैक्षणिक आढावा घेतला तर ही गोष्ट सहजच

४. Ibid p. 1.
५. Ibid p. 180.
६. Ibid p. 193
७. The report of the Indian Education Commission 1882. p. 2.
८. प्राचीन भारतीय शिक्षणपद्धति – डॉ. अळतेकर पृष्ठ २००.











लक्षांत येतें कीं, भारतीय लोक धर्माला विश्वाच्या प्रतिष्ठेचा मूलाधार मानत असल्यामुळें धर्म हा शिक्षणसंस्थेचा अविभाज्य भाग होता. शिक्षणाचें उद्दिष्ट व्यक्तीचा निव्वळ बौद्धिक विकास घडवून आणणें हें नसून त्याला मिळालेल्या शिक्षणाच्या परिणामस्वरूपीं त्याच्या वैयक्तिक व सामाजिक जीवनांत नित्य व सदासर्वदा उपयोगी पडेल अशी नैतिक व धार्मिक आचरण संहितेचा लाभ त्याला करून देणें हें होतें. व्यक्तीची एकांगी व अपूर्ण वाढ न होऊं देतां पूर्णमानवत्वाकडे ( whole man ) त्याचा विकास घडून आणण्याच्या कार्यांत त्याला मदत करणें हें शिक्षणसंस्थेचें ध्येय होतें[९].

या शिक्षण पद्धतीला जबरदस्त धक्का देऊन तिच्यांत आमूलाग्र बदल घडवून आणणारी व आजलाहि जिचे परिणाम जाणवतात अशी घटना म्हणजे हिंदुस्थानांत स्थापन झालेलें ईस्ट इंडिया कंपनीचें राज्य व त्याची पुढें ब्रिटिश राज्यांत झालेली परिणति. इंग्रजी सत्तेनें आपल्या कुटिल धोरणामुळें भारतीय शिक्षण पद्धतींतील धर्मशिक्षणाचें इतर शैक्षणिक विषयांशीं झालेलें संतुलन इतकें विचलित केलें कीं आजलाहि त्या सत्ताप्रहाराचे दुष्परिणाम समाजाला भोंवताहेत, व त्यांतून बाहेर पडून धर्मशिक्षणाला शिक्षणपद्धतींत देशकालवर्तमानानुसार योग्य स्थान देणें अतिशय बिकट झालेलें आहे.

### इंग्रजी राज्यांतील धार्मिक शिक्षणाची वाटचाल

इंग्रजांनी या देशांत धार्मिक बाबतींत निष्पक्षपातीपणाचें ( religious neutrality ) धोरण सुरुवातीपासूनच स्वीकारलें होतें. ईस्ट इंडिया कंपनी ही तत्कालीन शिक्षणसंस्थामधून खिश्चन धर्मतत्त्वांचें शिक्षण देण्यास फारशी अनुकूल नव्हती. सुरुवातीच्या काळांत जरी ब्रिटिश सरकार हें या प्रकारच्या शिक्षणाला अनुकूल होतें, तरी तें शिक्षणसंस्थामधून मिळणाऱ्या इतर धर्मीयांच्या धर्मशिक्षणाला प्रतिकूल नव्हतें. खिश्चन मिशनरी हे सुरुवातीपासूनच या धोरणाचा विरोध करीत होते. ब्रिटिश उमरावसभेच्या सिलेक्ट कमेटीपुढें दिलेल्या साक्षींत ( जून १८५३ मध्यें ) डॉ. अलेक्झांडर डफ म्हणतात, " सद्यःकालीन उघड उघड खोट्या शिक्षणाच्या जागीं खरें वाङ्मय व शास्त्रीय विषयांची योजना करण्यांत आली याचा आम्हाला आनंद वाटतो. परंतु या नव्या शिक्षणामुळें प्रचलित मिथ्या धर्माचें उच्चाटन होणार असलें तरी त्या धर्माच्या जागीं एकमेव खऱ्या धर्माचें-म्हणजेच खिश्चन धर्माचें- नियोजन झालें नाहीं ही दुःखाची गोष्ट आहे. "[१०] मिशनरी लोकांनी केलेल्या अखंड खटपटीचा व त्यांनी सरकारवर आणलेल्या सतत दाबाचा परिपाक असा झाला कीं त्या वर्गातर्फे झालेल्या एका सत्कारप्रसंगीं उत्तर देतांना तत्कालीन गव्हर्नर जनरल लॉर्ड बेंटिंकने शेवटीं निर्वाणीचे उद्गार काढले. तो म्हणाला, " धार्मिक बाबतींत संपूर्ण तटस्थपणाचें अवलंबन करणें हें हिंदुस्थानांतील ब्रिटिशसत्तेचें धोरण आहे. म्हणून सर्व सरकारी शाळा व विद्यालयांतून याच तत्त्वाचें पालन करण्यांत येईल; व विद्यार्थ्यांच्या धार्मिक शिक्षणांत ढवळाढवळ करण्यांत येणार नाहीं. प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें त्यांना खिश्चन धर्माचें शिक्षण देण्याला सरकार उत्तेजन देणार नाहीं. "[११] या त्याच्या

९. The report of University Education Commission. 1949. p. 287.

१०. Dr. Alexander Duff giving evidence before a Select committee of the House of Lords on the 3rd June 1853 said, " While we rejoice that true literature and science are to be substituted in place of what is demonstrably false, we cannot but lament that no provision whatever has been made for substituting the only true religion -- Christianity -- in place of the false religion which our literature and science will inevitably demolish. "
-[ The report of the University Education Commission p. 288. ]

११. In reply to an address by the Christian Missionaries, Lord Bentinck, the Governor-General said : " The fundamental principle of British rule, the compact to which the government stands solumnly pledged, is strict neutrality.











उद्गारांवर १८५८ मध्यें कोर्ट ऑफ डायरेक्टर्सच्या अहवालांत पसंतीचें शिक्कामोर्तब पडलें.

## भारतीय शिक्षण आयोग १८८२.

या आयोगानी सरकारचें धार्मिक निष्पक्षपातीपणाचें धोरण व विशिष्ट धर्मानुयायी लोकांच्या शिक्षणसंस्थांची समाजांतील सर्व थरांना उपयोगी पडण्याची अक्षमता या गोष्टींचा विचार करतां अशी शिफारस केली कीं धर्मांच्या मूलतत्त्वावर आधारित असें एक नैतिक शिक्षणाचें पाठयपुस्तक तयार करावें व तें सरकारी व गैरसरकारी शिक्षणसंस्थांतून वापरण्यांत यावें. आणि सरकारी वा निमसरकारी विद्यालयांतील प्राचार्यांनें वा एखाद्या प्राध्यापकानें कॉलेजच्या प्रत्येक सत्रांत मानव-धर्म व नागरिकधर्म यावर व्याख्यानें द्यावींत अशी सूचनाहि केली. या शिफारशींच्या बाबतींत न्या. तेलंग यांनीं आपल्या भिन्नमतपत्रिकेंत निराळे विचार व्यक्त केले. ते म्हणाले, " व्यवहार्यस्वरूपांत धार्मिक शिक्षण देण्याच्या दोनच पद्धति आहेत. एक तर सर्व धर्मांना समान असलेलीं तत्त्वें शाश्वत धर्माच्या ( Natural Religion ) नांवाखाली शिकविण्यांत यावींत किंवा प्रत्येक विद्यार्थ्यांच्या पालकांना मंजूर असलेल्या धर्म-विशेषाचीं तत्त्वें त्या विद्यार्थ्याला शिकविलीं पाहिजेत. सर्व गोष्टींचा साकल्यानें विचार करतां आपल्या सद्यःकालीन शिक्षणसंस्थांनी धार्मिक बाबतींत ढवळा-ढवळ करूं नये असें मला वाटतें; कारण अशा ढवळा-ढवळीमुळें होणारे परिणाम धार्मिक दृष्ट्या असमाधान-कारक व व्यवहारदृष्ट्या प्रतिगामी स्वरूपाचे ठरतील". [१२] या शिक्षण आयोगाच्या शिफारशींचा विचार करतां सरकारचें निधर्मी धोरण व शिक्षणसंस्थांतून सर्व प्रकार-च्या प्रचलित धर्मतत्त्वांचें शिक्षण देण्याची आवश्यकता या दोन्ही गोष्टींची सांगड घालण्याकरतां त्यांना वर दिलेल्या शिफारशींच्या शिवाय दुसरा मार्ग तर सुचला नसावा असें वाटतें. या सूचना कार्यान्वित केल्यास त्यांतून बऱ्याच कटकटी उद्भवतील व हा धार्मिक शिक्षणाचा प्रयोग अनिश्चित व संदिग्ध स्वरुपाचा ठरेल अशीं दोन कारणें देऊन सन १८८४ मध्यें भारत सरकारनें या शिफारशींची वासलात लावली.

यानंतर भारत सरकारनें इ. स. १९०२ मध्यें नेमलेल्या शिक्षण-आयोगानें पुनश्च या विषयावर विचार केला व निव्वळ निधर्मी शिक्षणे हें अपुरें पडेल असें मत व्यक्त केलें; पण निश्चित स्वरूपाच्या सुधारणा

---

To this important maxim, policy as well as good faith, have enjoined upon me the most scrupulous observance -- In all schools and colleges supported by the Govt. this principle cannot be too strongly enforced, all interference and injudicious tampering with the relgious beliefs of the students, all mingling, direct or indirect teaching of Christianity with the system of instructions ought to be positively forbidden. " – [ From the report of the University Education Commission p. 288. ]

१२. In regard to these recommendations [ of the Education Commission of 1882 ]. Mr. K. T. Telang who was a member of the Commission wrote : " There are only two possible modes, which can be adopted in justice and fairness, of practically imparting religious instruction. Either you must teach the principles common to all religious under the name of Natural Religion or you must teach the principles of each religions creed to the student whose parents adopt that creed. " Again " At all events, I am clear, that our institutions for secular instruction should not be embarassed by any meddling with religious instruction; for such meddling, among other mischiefs, will yield results which on the religious side will satisfy nobody and on the secular side will be distinctly retrograde. [ Ibid p. 289. ]



अनुक्रमणिका








सुचविल्या नाहींत. अध्यात्मशास्त्र (Theology) हा एक अभ्यासाचा विषय या स्वरूपांत शिक्षणक्रमांत दाखल करण्याला या आयोगानें आपला विरोध दर्शविला. हा विषय अजिबात अभ्यासण्याजोगा नाहीं असें त्यांचें मत नव्हतें तर कोणत्याहि एका विशिष्ट धर्माचा भाग समजून हा विषय शिकविणें हें अनिष्ट ठरेल व म्हणून अध्यात्मशास्त्राची शाखा विश्वविद्यालयांत काढण्याच्या त्यांच्यापुढें विचारार्थ मांडलेल्या सूचनेला त्यांनी विरोध केला. कलकत्ता विश्वविद्यालय आयोगानें (१९१७-१९१९) या विषयाला त्याच्या वादग्रस्ततेमुळें अजिबात बगलच दिली.

## स्वातंत्र्यपूर्वकाळांतील अंतिम निर्णय (१९४६)

मध्यवर्ती शिक्षण सल्लागार मंडळानें आपल्या म्हैसूर येथील बाराव्या बैठकींत (१९४६ सालीं) या प्रश्नाचा पुन्हा एकवार विचार केला. या प्रश्नाच्या अंगोपांगांची मूलभूत छाननी करून व धार्मिक शिक्षणाची उपयुक्तता व आवश्यकता यांबद्दल अनुकूलता दर्शवून सुद्धां धार्मिक शिक्षणाची जबाबदारी ही प्रामुख्यानें व्यक्तीपरत्वें त्याचें कुटुंब व त्याच्या सन्निध समाजखंड (Community) या दोघांनींच उचलावी असा ठराव पास करून हें मंडळ मोकळें झालें. पण ज्या प्रमाणें विद्यार्थ्यांचें वाङ्मयीन किंवा शास्त्रीय विषयाचें शिक्षण हें त्याच्या कुटुंबावर किंवा विवक्षित समाजखंडावर सोपवितां येत नाहीं, त्याचप्रमाणें धार्मिक शिक्षणाची जबाबदारीहि त्या दोघांवर सोपवितां येत नाहीं असा युक्तिवाद राधाकृष्णन् कमिशननें केला[13] व आपल्या विधानाच्या समर्थनासाठीं त्यांनीं धार्मिक शिक्षण हें वर निर्देशिलेल्या सामाजिक घटकांच्या स्वाधीन केल्यास त्याचा परिणाम जात्यंधता, असहिष्णुता व स्वार्थीपणा यांना उत्तेजन मिळण्याचा संभव असल्याचेंहि मत त्यांनी व्यक्त केलें.[14] अगदी अलीकडेच नेमलेल्या बाबू श्रीप्रकाश कमिटीचेंहि मत असेंच दिसतें.[15]

## स्वातंत्र्योत्तर काळांतील घडामोडींची रूपरेषा

भारत स्वतंत्र झाल्यानंतर मध्यवर्ती सरकारनें डॉ. राधाकृष्णन् यांच्या अध्यक्षतेखाली एक आयोग नेमलें. या आयोगानें डिसेंबर १९४८ ते ऑगस्ट १९४९ या काळांत लिहिलेल्या आपल्या अहवालांत हिंदुस्थानांतील धार्मिक शिक्षणाचा सविस्तर आढावा घेतला व या विषयाला धरून भारताच्या नवजात घटनेंतील १९, २१, २२ (१) आणि (२) या कलमांची तपशीलवार चर्चा आपल्या अहवालाच्या ८ व्या प्रकरणांत केली. भारतवर्षाच्या प्राचीनकालापासूनचा शैक्षणिक इतिहास पाहतां धर्मशिक्षण हें शिक्षणक्रमांतून वगळण्यांत येऊं नये व तसें केल्यास आपण हिंदुस्थानच्या परंपरागत इतिहासाला हरताळ फासण्यास उद्युक्त होऊं असा अभिप्राय त्यांनी व्यक्त केला. सरकारच्या निधर्मी धोरणाचा अर्थ विशद करतांना हें आयोग असें विचार व्यक्त करतें कीं भारत सरकारनें कोणाचाहि सद्यःकालीन धर्म हा शासनसंमत धर्म (state religion) आहे असें उद्घोषलें नसून सर्व धर्मांना समान लेखण्याच्या धोरणास तें वचनबद्ध आहे. प्रत्येक नागरिकाला धार्मिक बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य प्रदान केलें आहे. पण याचा अर्थ, निधर्मी राज्यांत धर्मविषयक अज्ञान व अनास्था यांनाच वाव द्यावयाचा असा न करतां प्रत्येक व्यक्तीनें जास्तीत जास्त अध्यात्मप्रवण होण्याचें ध्येय ठेवावें व आग्रही धर्मवेडे होऊं नये असाच करावा असें निश्चित सूत्र या आयोगानें लोकविचारार्थ मांडलें.[16] हें करतांना त्यांनी महात्मा गांधींच्या या विषयावरील विचारांकडे बोट दाखविलें. वर्धा शिक्षण-योजनेंतील धार्मिक शिक्षणक्रमाबद्दल पृच्छा केली असतां महात्मा गांधींनी त्याचा या योजनेंत अंतर्भाव न करण्याचीं कारणें देतांना आजच्या काळांतील धर्माच्या नांवाखालीं करण्यांत येणारें आग्रही आचरण व तदनुषंगी धर्मशिक्षण हीं दोन्हीहि देशाच्या एकतेला पोषक होतील असें वाटत नाहीं तर तीं संघर्ष व कलह

१३. Ibid p. 290.

१४. The report of the University Education Commission. p. 290.

१५. The report of the Committee on Religious and Moral Instruction p. 10–11.

१६. The report of the University Education Commission. p. 303.

यांचीं कारणें मात्र होतील असें मत व्यक्त केलें. पण सर्व धर्मांना समान अशीं सत्यें विद्यार्थ्यांना शिकवितां येणें शक्य आहे व तीं शिकविण्यांत यावीत असेंहि मत त्यांनी व्यक्त केलें.[१७] या विचारांना अनुकूल अशा शिफारशी या आयोगानें केल्या. त्या अशा :

१. सर्व शिक्षणसंस्थांनी, रोजच्या दिनचर्येच्या सुरवातीचा वेळ विद्यार्थ्यांना विचारसाधनेसाठीं मौन पाळण्यास द्यावा.

२. विद्यालयीन स्नातकीय शिक्षणक्रमाच्या प्रथम वर्षातील विद्यार्थ्यांना गौतमबुद्ध, कन्फ्यूशिअस, झोरोस्तर, सॉक्रेटिस, येशू खिस्त, शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, महंमद, कबीर, नानक, गांधी यांच्यासारख्या थोर धार्मिक नेत्यांच्या जीवनक्रमाची माहिती देण्यांत यावी.

३. द्वितीय वर्षांत जगांतील विविध धर्मग्रंथांतून सार्वत्रिक स्वरूपाचे ( Universalist ) उतारे शिकविण्यांत यावे.

४. तिसऱ्या वर्षांत धर्माचे तत्त्वज्ञानविषयक ( Philosophy of religion ) प्रश्नांची ओळख विद्यार्थ्यांना करून द्यावी.

यानंतर जवळ जवळ दहा वर्षांनी म्हणजे १९५९ सालीं भारत सरकारनें वर उल्लेखिलेले बाबू श्रीप्रकाश यांच्या अध्यक्षते खालील कमेटीची नियुक्ति केली. अध्यक्षाखेरीज या कमेटींत राजस्थान विश्वविद्यालयाचे कुलगुरु श्री. जी. सी. चॅटर्जी, जम्मू आणि काश्मीर विद्यापीठाचे कुलगुरु श्री. ए. ए. ए. फिझी व श्री. पी. एन्. किर्पाल हे सभासद व चिटणीस होते. या कमेटीकडे सोपविलेलें कार्य दोनप्रकारचें होतें तें असें : ( अ ) शिक्षणसंस्थांतून नैतिक व आध्यात्मिक मूल्याधिष्ठित शिक्षणाची इष्टता व व्यवहार्यता यांबाबतचा निर्णय व ( आ ) तें इष्ट व व्यवहार्य आहे असें मत पडल्यास (१) निरनिराळ्या शैक्षणिक स्तरांवरच्या विवक्षित शिक्षणक्रमाची योजना व (२) शिक्षणसंस्थांतील अभ्यासांत अशा प्रकारच्या शिक्षणक्रमांचें स्थान. सरकारनें ही कमेटी नेमतांना या कमेटीचे नांवामध्यें नैतिक व धार्मिक ( moral and religious ) असा शब्दप्रयोग केला असला तरी प्रत्यक्ष सोपविलेल्या कार्यभागांत ( terms of reference ) मात्र नैतिक व आध्यात्मिक ( moral and spiritual ) मूल्याधिष्ठित शिक्षण असें वर्णन केलेलें आढळतें. वेळेचा अभाव, सदस्यांच्या परस्परांना भेटण्यांतील अडचणी व शिक्षणखात्याला अहवाल मिळण्याची झालेली घाई या कारणसमुच्चयामुळें या कमेटीनें प्रश्नमालिकांचा ( questionnaries ) उपयोग केला नाही व कोणत्याहि व्यक्तीची साक्ष घेतली नाही. सभासदांचा परस्परांशी झालेला पत्रव्यवहार व मुंबईला राजभवनमध्यें ता. १७-१८ नोव्हेंबर व २१ डिसेंबर १९५९ या दोन-तीन दिवसांत झालेल्या बैठकीनंतर या कमेटीनें सदस्यांच्या मतांचा विचार करून एक सर्वसाधारण धोरण निश्चित करणारा अहवाल तयार केला.[१८]

सद्यःकालीन शालेय वातावरणांतील विविध घडामोडींचा विचार करतांना या कमेटीनें काढलेले उद्गार माननीय आहेत. ती म्हणते सर्व दूर व सर्व स्तरांवर सध्याच्या घटकेला शिक्षणसंस्थांची निकड भासू लागली आहे. आपल्या घटनेंतील एका आदेशाप्रमाणें प्राथमिक शिक्षण हें शक्य तितक्या लौकर सार्वत्रिक व्हावयाला पाहिजे. शाळा, विद्यालयें व महाविद्यालयें यांची संख्या सतत वाढतेच आहे. सध्याच्या घटकेला शाळांतून मिळणारें शिक्षण हें उपयोगी नाहीं अशी धारणा आहे. आपल्या भवितव्याच्या कल्पनेच्या अनिश्चिततेमुळें विद्यार्थी

---

१७. In June 1938, Gandhiji was asked about the place of religious instruction in the Wardha scheme. He answered : " We have left out the teaching of religions from the Wardha Scheme of education bacause we are afraid that religions as they are taught and practised today, lead to conflict rather than unity. But on the other hand, I hold that ths truths that are common to all religions can and should be taught to all children " [ The report of the University Education Commission, p. 299 ].

१८. The report of the Committee, p. 2.








शाळेंत शिकतांनाहि निराश व निरुत्साही झाल्याचें आढळून येतें; बेकारीचा प्रश्न दिवसेंदिवस उग्रच होत चालला असल्यामुळें व्यक्तिगत वैफल्याची भावना वाढीला लागली आहे. त्यामुळें आपल्या सामाजिक व आर्थिक जीवनाची घडी विसकटते आहे.......या परिस्थितीच्या जोडीलाच शाळांच्या बाहेरच्या जगांत वावरतांना विद्यार्थ्यांच्या मनावर निरनिराळ्या समाज-विघटनात्मक शक्तींचा परिणाम होतो. म्हणूनच आज-कालच्या विद्यार्थ्यांच्या गैरशिस्त वर्तणुकीबद्दल त्यांना दोष देणें उचित ठरणार नाही; कारण वडीलधाऱ्या माणसांच्या घरांतील, व्यवसायांतील, राजकीय क्षेत्रांतील व इतर सामाजिक बाबतींतील मूल्यावरची घसरलेली निष्ठा व तदनुषंगिक वागणुकींचा त्यांच्या मनावर परिणाम होतो.

या कमेटीनें आपल्या अहवालांत पुष्कळशा इतर मुद्यांचा विचार केला आहे. नैतिक व आध्यात्मिक मूल्यांची आपली कल्पना विशद करतांना ही कमेटी असें म्हणते कीं आयुष्यांत उद्‌भवणाऱ्या, मग ते घरांतील, समाजांतील, आर्थिक व इतर निरनिराळ्या बाबतींतील प्रसंगांना म्हणजेच मानवांच्या परस्पर संबंधात्मक आचरणावर नैतिक मूल्य भर देतात[१९] तर आध्यात्मिक मूल्यांचा परिणाम त्या व्यक्तीच्या आत्मज्ञानावर होतो (Spiritual values affect the individual in his relation with himself.)[२०] आजकालच्या काळांत धर्म व धर्मविषयक सामाजिक अनास्था व धार्मिक व नैतिक शिक्षणक्रमांतर्गत निरनिराळ्या कल्पनांचा साधक बाधक विचार करून या कमेटीनें पुढील शिफारशी केलेल्या आहे.

(अ) धार्मिक व नैतिक मूल्याधिष्ठित शिक्षणाचा अंतर्भाव शिक्षणांत करणें इष्ट आहे व तसें करणें हें कांहीं मर्यादेंत व्यवहार्य स्वरूपाचें ठरेल.

(आ) या शिक्षणक्रमांत सुरवातीला निरनिराळ्या धर्मांतील थोर पुरुषांचा जीवनक्रम व शिकवणूक यांचा तौलनिक अभ्यास योजण्यांत यावा व तदनंतर त्यांच्या नैतिक व तात्त्विक कल्पनांचा अभ्यास व्हावा. शिष्टाचार, समाजसेवा व खरा देशाभिमान यांचें महत्त्व मुलांच्या मनांवर ठसविण्यांत यावें.

(इ) घराघरांतून देण्यांत येणाऱ्या धर्मशिक्षणाचें महत्त्व फार आहे व त्यामुळें त्याकडे दुर्लक्ष होऊं नये. रेडिओ, सिनेमा वगैरे सारख्या आधुनिकतम जनसंपर्काच्या साधनांकडे दुर्लक्ष न करतां त्यांचा या कार्यासाठी भरपूर उपयोग करण्यांत यावा.

(ई) दैनंदिन कार्यक्रमाच्या सुरुवातीवाला शिक्षणसंस्थांनी सर्व विद्यार्थ्यांना एकत्र जमविण्याची प्रथा पाडावी. एकत्रित आले असतां वा निरनिराळ्या वर्गांत विभागून कांही वेळ विचारसाधनेसाठी विद्यार्थ्यांना मौन पाळण्यास उत्तेजन देण्यांत यावें, किंवा प्रार्थना करावी वा एखाद्या धर्मग्रंथांतील उतारा विद्यार्थ्यांना वाचून दाखविण्यांत यावेत.

(उ) सर्व धर्मांच्या शिकवणुकीची योग्य व तौलनिक माहिती देणारीं पुस्तकें तयार करण्यांत यावींत.

(ऊ) शारीरिक शिक्षण हें शक्य तितक्या प्रमाणांत सक्तीचें करण्यांत यावें व सांघिक कवायती व खेळ यांवर भर देण्यांत यावा.

(ए) धार्मिक शिक्षण व धर्म आदि विषयांवर अधिकारी व्यक्तींचीं व्याख्यानें घडवून आणावींत व त्यावर चर्चा व परिसंवाद यांचें आयोजन व्हावें.

## उपसंहार

वर निर्देशिलेल्या सगळ्या आयोगांच्या व कमेटींच्या अहवालांचा व तदंतर्गत शिफारशींचा साकल्यानें विचार करतां एक गोष्ट स्पष्टपणानें नजरेत भरते. ती अशी कीं धार्मिक शिक्षणाची आवश्यकता सर्वांनाच पटलेली दिसते. इंग्रजी राज्यांतसुद्धा सरकारला धर्मशिक्षणाच्या महत्त्वाची जाणीव होती; पण शिक्षण संस्थांमधून खिश्चनधर्माचें शिक्षण देण्यामुळें उद्‌भवणाऱ्या संघर्षांना व त्यांच्या राजकीय परिणामांना टाळण्याची त्यांची इच्छा प्रबल होती. या इच्छेमुळेच त्यांनी शिक्षणसंस्थामधून धार्मिक शिक्षणाची आवश्यकताच नाहीं असें ठरवून धर्मप्रसारासाठी मिशनऱ्यांना इतर मार्ग मोकळे ठेवले. तदनंतरची दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी कीं या धार्मिक शिक्षणाच्या कार्यक्रमांत घर व शिक्षणसंस्था या दोनहि सामाजिक संस्थांना स्थान आहे ही गोष्टहि सर्वमान्य दिसते. फक्त मध्यवर्ती शिक्षण

१९. Ibid p. 12.  २०. Ibid p. 13.

सल्लागार मंडळानें आपल्या बाराव्या बैठकींत हें शिक्षण घर व व्यक्तिसन्निध समाजखंड ( Community ) यांनीच द्यावें असा ठराव पास करून शिक्षणसंस्थांना या शिक्षणाच्या जबाबदारींतून वगळलें. हा ठराव १९४६ साली पास झाला ही गोष्ट लक्षांत घेतां त्या वेळच्या राजकीय पार्श्वभूमीवर या निर्णयाच्या पाठीमागचीं कारणें लक्षांत येतात. त्याचप्रमाणें गेल्या दीडशें वर्षांचा या विषयाचा इतिहास पाहतां धार्मिक शिक्षणक्रम व त्यांतील विषय, हे शासनसंस्थेंतील होत जाणारे बदल, समाजांतील एका विशिष्ट वर्गाची मिशनऱ्यांचीं या विषयांवरचीं आग्रही मतें, लोकांच्या धर्मभावना दुखविण्याची सरकारला वाटणारी रास्त भीति व जागृत व प्रभावी होत असलेलें हिंदी लोकमत, या चार सामाजिक घटकांच्या प्रभावानुसार वेळोवेळीं परिस्थित्यनुसार बदलतच गेलें व त्यामुळें शैक्षणिक परिवर्तन हा सामाजिक स्थित्यंतराचें एक स्वरूप आहे, [ Educational change is a form of social change ] या मताला पुष्टी मिळते.

बाबू श्रीप्रकाश कमेटीच्या नजरेंत न आलेल्या एका मूलभूत स्वरूपाच्या प्रश्नाकडे त्या कमेटीचा अहवाल बाहेर पडण्याच्या वेळेलाच एका विचारवंताने लोकांचें लक्ष वेधलें आहे. रामकृष्णाश्रमाच्या दिल्ली येथील शाखेपुढे दिलेल्या व्याख्यानांत डॉ. चिं. द्वा. देशमूख यांनी वर उल्लेखिलेल्या राधाकृष्णन् कमिशनच्या शिफारशींचा उल्लेख केला. त्या शिफारशी आपल्याला अपुऱ्या व असमाधानकारक वाटतात असें सांगून त्यांनी त्या पाठीमागचीं कारणेंहि दिलीं. ते म्हणाले, " हिंदुधर्म किंवा बौद्धधर्म या सारख्या उदार व सहिष्णु धर्माच्या अनुयायांना परमतसहिष्णुता ही जितकी सहजसाध्य आहे तितकी आग्रही ( dogmatic ) स्वरूपाच्या धर्मानुयायांना नाहीं; हें एक कारण होय. दुसरें कारण असें कीं जर नैतिक शिक्षण हें विद्यार्थ्यांच्या विवक्षित धार्मिक श्रद्धांचा आवश्यक भाग म्हणून त्यांच्या जीवनाच्या विशिष्ट काळांत ( म्हणजेच शालेय जीवनांत ) दिलें नाही तर नैतिकदृष्ट्या शुद्ध आचरणाची शिकवण देणें हा जो धार्मिक शिक्षणाचा व्यवहार्य हेतु आहे त्याचें महत्त्व विद्यार्थ्यांना आकलन होणार नाही. यामुळें या दृष्टीनें विचार करतां मला असें वाटतें कीं जर शिक्षणसंस्थांतील नैतिक शिक्षण हें खरोखरच प्रभावी व्हावें अशी इच्छा असेल तर तें शिक्षण हें विशिष्ट धर्मांनीं निर्माण केलेल्या तात्विक पार्श्वभूमीवर व्हावयाला पाहिजे व बौद्ध लोकांचे पंचशील किंवा खिश्चन लोकांचे दहा आदेश यांच्यासारख्या त्या धर्माच्या मूलतत्वांशी निगडित असावें व त्या तत्वांच्या साहाय्यानेच नैतिक शिक्षण देण्याचा प्रयत्न करण्यांत यावा. " [२१]

हे विचार चिंतनीय नाहीत असें कोण म्हणेल ?

---

२१. " The reasons which have influenced me are two : the first is the one that tolerance of other religions dogmas and creeds is not as easy to the followers of degmatic religions as it is to the followers of religions like Hinduism or perhaps Buddhism : and second that moral instruction, which is the essence of the aim of religious instruction, at least from the practical point of view, seems to lack the necessary appeal unless it is a part of religious instruction and is also imparted at an appropriate stage of life.

Following this trend of thought, I have come to the conclusion that if moral instruction has to have any effectiveness at all, it has to be a part of some specific religious dogma or creed and the instructiou has to be made imperative as part of the creed, as, for instance, the Panchshile for Buddhists or the Ten Commandments for Christians "

– From the speech of Dr. C. D. Deshmukh before the Ramakrishna Mission Delhi as reported by the Bhavan's Journal dated /24–1–1960.



अनुक्रमणिका







श्री. विनायकराव करमळकर

# प्राचीन द्वारकेचा उकल निर्णयात्मक नाहीं !!

भारतीय इतिहासज्ञ व पुरातत्त्वविद यांची स्थिती एक तऱ्हेने अत्यंत दयनीय आहे; असें म्हटल्यास वास्तविक प्रत्यवाय लागू नये. कारण पुरातन कालापासून आपलेकडे घटना किंवा प्रसंग यथार्थत्वाने नोंदवून ठेवावयाची मुळी प्रथाच नाहीं. कालनिर्णय करावयास मुख्यतः भूगर्भशास्त्रावरून माती व प्रस्तरांथरांचें ज्ञान, शिलालेख, ताम्रपट, उत्खननांत सापडणाऱ्या वस्तु म्हणजे मातीचीं भांडीं, धातूचीं भांडीं, नाणीं इत्यादि किंवा हस्तलिखितें यांचा पुरावा हा पहिल्याप्रतीचा होय. त्या अभावी आपली सारी भिस्त पुराणावर येऊन पडते. साऱ्या पुराणांत एकवाक्यता सापडणें एकतर कठीण, कांहीं पुराणें केवळ पाठभेद किंवा श्लोकांच्या फरकानें एक दुसऱ्याचा पाठपुरावा करणारीं अशीं होत. त्या पुराणांतहि पूर्वापर संबंध लावावयाचा म्हणजे पुन्हा वरील पुराव्याऐवजीं तीच भानगड. असो.

प्रस्तुत प्रश्नाचा निर्णयात्मक उकल लावावयाच्या प्रयत्नांत उपरोल्लेखित पहिल्या प्रतीचा पुरावा आज तरी अनुपलब्ध आहे. यासंबंधी मागील लेखन म्हणजे श्री. एन. के. मट्टसाली यांचा इंडियन हिस्टॉरिकल क्वाटर्ली १९३४ मधील लेख, त्यांत ते म्हणतात, पुरातन द्वारावतीचा अभेद्य किल्ला जो जुनागडजवळ आहे तीच द्वारावती. म. म. हाथीभाईशास्त्री हे कृष्णकालीन द्वारका द्वारकामाहात्म्यावरून ठरवूं पाहातात तें तर मुळींच चूक. आधुनिक द्वारकेची प्रशस्ती ही मुळी १२ व्या शतकांतील, मग त्यापुढें द्वारकामाहात्म्य. यानंतर डॉ. ए. डी. पुसाळकर हे आधुनिक द्वारकेचा कृष्णकालीन द्वारकेशी निश्चित संबंध नाहीं म्हणत नाहींत पण पिंडारकतीर्थाचा पुरातन द्वारकेशीं हवाला देत आहेत. त्यांचें हें म्हणणें ( बी. सी. लॉ. व्हॉल्यूम भाग १ ) प्राध्यापक व्ही. बी. आठवले यांनी आपल्या विद्वत्ताप्रचुर लेखाने भारतीय विद्या व्हॉल्यूम ८ १९४७ अंक ८, ९, १० यांत निराकरित केलें आहे.

प्रस्तुत लेख मुख्यतः प्राध्यापक आठवले यांच्या उपरिनिर्दिष्ट लेखास उत्तर म्हणून आहे. सदर लेखांत श्री. आठवले आधुनिक ओखा मंडलची द्वारका ही कृष्णकालीन द्वारका नाहीं म्हणतातच. पण सध्या कोडीनारपासून ३ मैलावर असलेली मूळ द्वारका हा भू-भाग कृष्णकालीन असावा व खरी, द्वारका समुद्रांत बुडाल्याचें पौराणिक आधारावर म्हणतात.

## महाभारतावरून निघणारा निष्कर्ष

मागील लेखांत सुचविल्याप्रमाणे यासंबंधी मुख्यतः महाभारतावरच अधिक अवलंबलें पाहिजे. महाभारताचे कालनिर्णयासंबंधी विद्वान माणसांत एकमत असावें तेंहि दुर्दैवाने दिसून येत नाहीं. भारताचार्य कै. वा. चिं. वि. वैद्य यांचे मतें- सौतीने सध्याचें विस्तृत महाभारत साधारण खिस्ताब्द २५० वर्षापूर्वी रचलें असावें असें आपल्या संस्कृत साहित्याच्या इतिहासांत म्हटलें आहे. ( अर्थात् मूळ महाभारत याहि पूर्वी ५-७ शें वर्षें अस्तित्वांत होतें. ) वैद्यांचा पाठपुरावा लोकमान्य टिळक आपले गीतारहस्यांत खालीलप्रमाणें करतात.

शकारंभाच्या पूर्वी हरिवंशासुद्धां हल्लीचें लक्षश्लोकात्मक महाभारत प्रचलित होतें. शकापूर्वी ५ शें व्या सुमारास हल्लीचें महाभारत झालें असावें असें गणिताने दाखवितां येतें. ( गो. र. पृ. ५७७ ) डॉ. भांडारकर, कै. तेलंग, कै. दीक्षित, डॉ. आळतेकर यांचेंहि मत थोड्याफार फरकाने असेंच आहे. "हस्तीनापूरकी खुदाई के बाद विभिन्न परतोंका निरीक्षण करनेपर विद्वान इस मत पर पहुंचे हैकि, महाभारत का युद्ध ईसापूर्व ९०० वर्ष हुवा था. ज. कृ. दवे, भारतीकाल्पो लेख फरवरी १९६१." पुराणांचा क्रम ऐतिहासिक राजघराण्याशी लावतां स्थूलमानानें गुप्त, मौर्य, आंध्र या क्रमाने वायु, विष्णु, मत्स्य असा लागेल. इतर पुराणें त्या मानाने आधुनिक असें निर्विवाद ठरवितां येईल. असो. हरिवंश हा ग्रंथ











अनुक्रमणिका

खिल (पुरवणी Appendix) स्वरूपाचा असून त्याला बाकीच्या महाभारताइतकें प्रामाण्य देतां येणार नाहीं म्हणून सभापर्वातील वर्णन मूळ खरें. हरीवंशकाल भौगोलिकदृष्ट्या अज्ञानी किंवा स्थानिक अभिमानी होत हें डॉ. काणे यांचें म्हणणें ग्राह्य धरणें भाग आहे. गोमंतगिरीशी श्रीकृष्णाच्या अवतारकृत्याचा संबंध आणणारें वर्णन पाठीमागचें धरलें पाहिजे. हें कबूल केलें तरी श्री. कै. शेणै गोयब्राब – श्री. वामनराव वर्दे यांनी वि. ज्ञा. वि. वर्ष ६२ जानेवारी १९३१ मध्यें गोमंतगिरी हा कुवेशी घाटाजवळ गोव्याजवळचाच गिरी हें आपलें मत म्हणून दिलेलें आहे. तेंच प्रस्तुत लेखक असंदिग्धरीत्या ग्राह्य मानतो. कारण आधुनिक भौगोलिक माहितीशी तोलून पहातां तेंच खरें दिसतें. राम–कृष्ण यांची भार्गवरामाशी भेट, वेण्या नदी, करवीर प्रांत म. म. चित्रावशास्त्री यांचेंहि मत मुख्य गोमंताबद्दल तेंच आहे. तसेंच वि. ज्ञा. वि. वर्ष ६४ अंक ६ मध्यें श्री. वर्दे महाभारतांत रैवत शब्द दोन वेळ, रैवतक शब्द सात वेळ इत्यादि स्पष्ट उल्लेख महाभारतांतील वचनें उद्धृत करूनच करतात. आजच्या गिरनारला म्हणजेच प्राचीन ऊर्जयंताला गोमंत हें नामाभिधान रम्यतेबद्दल मागाहूनच एतावतः आगंतुकच मिळालें असावें. बरें. गोमंत नांवाचे दोन किंवा अधिक पर्वत समजल्यास प्रत्यवाय काय म्हणून असावा ? कुशस्थली ही विंध्यपर्वताचे पठारावर वैनगंगेचे तीरीं दक्षिण कोसलची राजधानी जी आज रायपूर जिल्हा मध्यप्रदेश मधील श्रीपुर असावी असें श्री. मिराशी आपल्या संशोधन मुक्तावली सर ३ पान ७८ वर म्हणतात " तसेंच बौद्धवाङ्मयांतील कुशिनगर किंवा उशिनारा ही देखील कुशस्थलीच होय. महाभारत सभापर्व अध्याय १३ यांतील ६, ८ श्लोक जे आम्ही मागील लेखांत उद्धृत केलें आहेत त्यांतहि पाठभेद आहेत. जसें रम्यांचे जागीं शून्या, माधवी बद्दल मागधम, गिरिमुख्य चे जागीं दर्विमुख्यं व **भवंतम चे जागीं गोमंतम अर्थात्** हा गोमंत शब्द येथे अगदींच उपरी असल्यासारखा आहे. गोमंतम समुपाश्रिताः याचा अर्थ कै. वा. काशीनाशास्त्री लेले व आचार्यभक्त विष्णुशास्त्री बापट यांनीं जातिवंत विपुल गायींनी युक्त असलेल्या रैवतक पर्वताचा आम्ही आश्रय केला असा केला आहे. व्याकरणदृष्ट्या गोमंतमपासून हा अर्थ कसा सिद्ध होतो हें त्यांचें तेच जाणोत पण वस्तुस्थितिनिदर्शक जातिवंत गीर व कॉंक्रेज या सुप्रसिद्ध गोवंशाची पैदास जुनागडच्या आसमंतांतच पुरातन कालापासून आहे हें मात्र खरें. दुसरें असें की, हरिवंश विष्णुपर्व अध्याय ४० मध्यें सदर पर्वतावर व त्याचे आसमंतात भागांत मयूरांचें व सिंहाचें प्रचुरत्व वर्णन केलें असल्याने प्रस्तुत द्वारकाप्रश्नासंबंधी गोमंत म्हणजेच पूर्वीचा ऊर्जयंत किंवा आजचा गिरनार पर्वतच अभिप्रेत आहे.

> गोमंतम् अचलम् प्राप्तः मंदरं त्रिदशाइव ।
> – ह. वं. वि. प. अ. ४० श्लोक १९
> मत्तबर्हिण निर्घोषं नादितं प्रतिनादितं ।
> सिंह शार्दूल संन्नादैः मेघनादितम् ॥
> ( पाठभेद. सततं प्रतिनादितं )

याशिवाय ऊर्जयन्तापासून निघणाऱ्या स्वर्णसिकता व पलाशिनी नद्या आजहि हा पुरावा देत आहेत. जुनागडच्या याच बाजूने बलराम व कृष्ण गोमंतक म्हणजे गिरनार पर्वतावर चढले. कालयवनाचे वेळीं दुसऱ्या प्रसंगीं कृष्णास मथुरा सोडून पळावें लागलें तेव्हां त्याने गोमंताचाच आश्रय घेतला. ज्या मुचकुंद गुहेंत कृष्णाने कालयवनास चकविलें ती गुहा आजहि जुनागडजवळच दाखविली जाते.

## जुनागडच्या आसमंतांत उत्खनन व्हावें !

महाभारताचा हवाला हा अधिक विश्वसनीय का मानावयाचा हें आम्ही मागील लेखांत अनेकवार दाखविलें आहेच. त्या मानाने हरिवंश हा महाभारताच्या केवळ एक षष्ठांश असून त्यांत एकंदर श्लोक १६३७४ च आहेत. यांतील वर्णन कृष्ण भगवद् अवतार या स्वरूपाचे व सर्व पुराणाप्रमाणे अतिशयोक्त आहे. त्यामानाने भारतकाराची प्रतिज्ञाच मुळी इतिहास कथन करण्याची आहे हें सुविद्य पुरातत्त्वविदास सांगणें नकोच. हरिवंश अंतःपुराव्यावरून दक्षिणेंत रचला गेला आहे.

"Harivansh is part of the Mahabharat but it is of mnch Iater date and may more accurately be ranked with







Pauranic compiletion of least anthenticity, and latest date. – Wilson

हरिवंश, विष्णुपर्व अध्याय ४२ हा पूर्णतः गोमंतदाह या विषयास खर्ची पडला आहे. ऊर्जयंत म्हणजेच गोमंत किंवा आधुनिक गिरनार हे जर प्राध्यापक आठवले यांना आमचेप्रमाणेंच अभिप्रेत आहे तर त्यांच्याच आवडीच्या हरिवंशावरून तो पर्वत चेदिराज दमघोष यांचा सल्ला जरासंध व इतर राजास पटून– जो चौफेर पेटाविला गेला तो त्यावर असलेल्या राम–कृष्णांना जिवंत जाळून मारण्याच्याच व्यूहानें वा आणिक कशाकरितां ? सदर पर्वतावर ते मृगयेला किंवा फिरतीला (इव्हनिंग स्ट्रोल) कां गेले होते ? समुद्रापासून गोमंतगिरीचा पायथा किमान ५० मैल असल्याचें श्री. आठवले जाणतातच. मग या अभेद्य व निर्धास्त किल्ल्याचा आश्रय सोडून दुसरा असा अभेद्य भू-भाग मूळ द्वारकेजवळ होता व तो कृष्णनिजधामाभिगमन समयीं समुद्रांत बुडाला हा जो पौराणिक उल्लेख तो केवळ कल्पनामयच नाहीं तर दुसरें काय असणार ? महाभारत अध्याय १४ अ किंवा भांडारकर इन्स्टिट्यूट प्रत अध्याय १३ श्लोक ५३-५४ यावरून हा अभेद्य किल्ला ३ योजनें लांब व तितकाच रुंद असें दिसून येतें.

त्रियोजनायतं सद्ं त्रिस्कंन्ध योजनादधि ।
योजनान्ते शतद्वारं विक्रमक्रमतोरणम् ॥ ५४ ॥

अमरकोशाप्रमाणे एक योजन म्हणजे किमान ८ मैल अर्थात् वरील भू–भाग म्हणजे २४ मैल लांब आणि २४ मैल रुंद. हा प्रचंड अभेद्य भू-भाग समुद्रांत बुडाला याचें कारण काय तर ' हरिवंश–भागवतकारांचें पौराणिक भाकित ' चरम मर्यादांचे लाटावर ७० फूट लाटा वाढून सागराने सर्व घशांत घातलें याला दाखला कशाचा ? तर भागवत एकादशस्कन्ध ३०, ३१ अध्यायाचे श्लोक. हें ऐतिहासिक दृष्टींत मुळीच बसत नाहीं. एवढा भू–भाग समुद्रांत बुडाल्याचें काल्पनिक समजलें तरी त्याला हजारों वर्षांचा अवधि लागावा.

भांडारकर इ. महाभारत प्रत कैरातपर्वणि अ. १५ श्लोक ३ यांत शिशुपाल वधानंतर शाल्वाने द्वारकेवर चढाई केल्याचें वर्णन सुरू झालें आहे —

अरुन्धतां सुदुष्टात्मा सर्वतः पाण्डुनंदन ।
शाल्वो **वैहायसं** चापि तत् पूरं व्यूह्य विष्ठितः ॥३॥

शाल्वाने आपल्या सेनेने सर्व द्वारावतीस वेढा दिला व स्वतः आकाशचारी विमानावर म्हणजे **सौमावर** व्यूहरचनापूर्वक विराजमान झाला.

या युद्धसमयी आनर्तदेशीय नट-नर्तक गायकांना नगरांतून निष्कासित केलें गेलें होतें. द्वारकापुरींत यावयाचे पूल तोडले गेले. नावा रोखून, खाईमध्यें कांटे पेरले गेले. परवल ( सांकेतिक शब्द ) वाचून द्वारकेंत घुसणें वा बाहेर पडणें अशक्य केलें गेलें होतें. हें श्री. आठवले यांस मंजूर आहेच. या सौम आकाशयानाचा पुढेहि सर्वत्र उल्लेख आहे. सौम हें आकाशयान युद्धनौका ( Battleship ) नाहीं. प्रा. आठवले यांना हें ठाऊक नसावें असें कसें म्हणणार ? मूळ द्वारका अंतर्द्वीप किंवा समुद्रांवर जर त्यांना अभिप्रेत आहे तर सोयीच्या दृष्टीनें आकाशयान हें ते युद्धनौका करूं पहातात असा आक्षेप जर कोणी घेतला तर त्याचें उत्तर ते काय देणार ? जॉन डॉक्सन हा आपल्या कोशांत सौम हे Magical City appearently first mentioned in the Yajurved, Khapur pratimargak and tranga. म्हणतो. – हरिश्चंद्राचें आकाशस्थ नगर, कधी कधी सध्याहि दिसतें हें लिहितात तें काय उगाच ? हें असो. शाल्वास जिंकावयाचे इच्छेने कृष्ण द्वारका परित्याग करून शाल्वनगरी मार्तिकावत येथें पोहोंचले. त्यास याकरितां पुष्कळसे देश व वृक्षराजींनीं भरलेले पर्वत, सरोवरें व नद्या ओलांडून जावें लागलें.

समतीत्य बहून् देशान् गिरीश्च बहुपादपान् ।
सरांसि सरितश्चैव मार्तिकावतमासदम् ॥१५॥ अ. २१
– कैरात पर्वाणि सौम वधोपाख्यानम् ।

समुद्रांतच अंतर्द्वीप द्वारका होती किंवा समुद्राकाठापासून जवळच जर ती असेल तर या श्लोकाचें वैयर्थच सिद्ध होईल. पण द्वारका समुद्रापासून बरीच दूर असल्याचें या श्लोकाने द्योतन होतें असें कां म्हणूं नये ? शाल्वाशी युद्ध सागरतीराजवळ आहे, रैवतक पर्वताबद्दल हेंच जॉन डॉक्सन पुढील प्रमाणें लिहितात;

The range that branches off from the western portion of the Vindhya towards the North extending nearly to the Jumna. याला कांहीं अर्थ आहे नां ?










कुशस्थली – द्वारका हेंच गिरीनगर व आजचें जुनागड असें जें आम्ही मागील लेखांत ध्वनित केलें, त्या जुनागडचे पूर्वेस बात्रा प्याराचे मठाजवळ जो शिलालेख श्री. बर्जेस यांस प्राप्त झाला त्याचा उल्लेख डॉ. व्ही. एस्. सुकथनकर यांचे अभिनंदन ग्रंथांत पान २२७ वर आहे तो असा –,

The only locality which record mentions is the well known Girinagar which was the ancient name of Junagadh and which survives in that of the adjancent hill of Girnar ( 24 ).

हू एत्-सँग हा चिनी प्रवासी जें आपल्या वेळचें वर्णन लिहून ठेवितो तें असें —

Not far from the City is a mountain called Yua – chen – to ( Ujjayanta ) On the top of which is a Sangharam, the cells and galleries have mostly been excavated from the mountain side.

– Vol. 2 Page 269 ( BEAL )

गिरनार किल्ल्याचे पश्चिमेस १॥ मैलावर जें उपरकोट किल्ल्याचें वर्णन काठीयावाडचे इतिहासांत पृ. ५५ वर श्री. विलबर फोर्स बेल यांनी लिहिलें आहे तेंच आम्हास तरी श्री. एन. के. भट्टसाली यांचे म्हणण्याप्रमाणें गिरीनगरचे भग्नावशेष वाटतात.

Barada Hills in Halar near present Dwarka cannot be taken as Raivatak.

( PARGITAR )

आम्ही पूर्वींच लिहून चुकलों कीं संस्कृत साहित्यांत समुद्रकाठीं द्वारका असल्याचा पहिला दावा हरिवंश रचनाकारास द्यावा लागेल. महाभारतांत मौसल पर्व ( महाभारताची रचना एक वेळची नाहीं हें सर्वश्रुतच आहे. ) वायु पुराण, ब्रह्म व ब्रह्मांड पुराण त्यानंतर विष्णु पुराण, भागवत, त्रिखंड देश व घटजातक यांचे द्वारकेबद्दल– ती समुद्रकाठीं असल्याचे श्लोक आम्हीं पाहिले नाहींत असें नाहीं. तेच जर आम्हास प्रा. आठवले दाखविणार असतील तर आमचें समाधान होण्यासारखें नाहीं. तसेंच – The leagend about the Dwarka being engulfed in oceanic inudation seems to be true as literary evidence supports it.

हें कै. डॉ. आळतेकरांचें विधान त्यांच्याच पूर्वी लेखांत उद्धृत केलेल्या कृष्णकालीन द्वारकेस बाधक आहे. भू–भाग बुडाला असेल पण तो तथाकथित आधुनिक द्वारकेचाच असावा अशा स्थितींत अेरियल फोटोग्राफस घेऊन जो संशोधनाचा उद्योग सुरू आहे तो डोंगर पोखरून उंदीर काढावयाच्याच योग्यतेचा म्हटला जाईल. त्यापेक्षां जुनागडचे आसमंतात् विचारी पुरातत्वविदांचे मार्गदर्शनांत जर उत्खनन झालें तर या प्रश्नावर आशाप्रद निष्पत्ति होऊं शकेल असें आम्हास वाटतें. वर दिलेल्या पुराव्यावरून अद्यापहि आग्रहपूर्वक जर कोणास आधुनिक द्वारका किंवा मूळद्वारकेजवळचा भू–भाग हीच कृष्णकालीन द्वारका म्हणावयाचें असेल तर त्यांनी तसें म्हणावें आम्ही 'हो' म्हणतों. परत एकदां मागील लेखांत म्हटल्याप्रमाणें आधुनिक पुरातत्ववादी यावर उपोद्बलक पुराव्याने प्रकाश टाकण्याचें श्रेय घेतील अशी आमची नम्र विनंती आहे.

श्री. भा. रं. कुलकर्णी

# छत्रपति संभाजी, शंभुदास देसाई आणि चंपा

श्री. बेंद्रे यांना संभाजीच्या चरित्राच्या साधनांचा शोध घेतांना हरिकविकृत 'शंभुराजचरित' या संस्कृत काव्याचा आढळ झाला. तें त्रोटकच उपलब्ध होतें पण शिवनृपापासून शंभुनृपति झाला असा चरित्रनायकाचा त्यांत उल्लेख आढळल्यानें हें एक, संभाजीचरित्राचें साधनच आहे असा त्यांचा समज होऊन त्यांनीं या संस्कृत हस्तलिखिताचा अधिक अभ्यास व्हावा या हेतूनें तें श्री. पी. के. गोडे यांच्या निदर्शनास आणलें. श्री. गोडे यांनी त्याचा विविध प्रकारानें उपयोग करून त्यावर अनेक लेख निरनिराळ्या नियतकालिकांतून लिहिले. श्री. गोडे यांचें मूळ लिखाण इंग्रजींतून असतें व त्यासाठीं साधारणत: इंग्रजी नियतकालिकें ते पसंत करत आले आहेत. यामुळें महाराष्ट्रांतला वाचक त्यांच्या लेखांना बराचसा पारखाच राहिला आहे. प्रस्तुत लेखकाच्या निदर्शनास त्यांनीं शंभुराज चरितावर उभारलेल्या लेखनसंभारापैकीं मुंबई विद्यापीठाच्या नियतकालिकांतील (जुलै १९४६) नंदुरबारच्या जटाशंकर मंदिरावरचा लेख आला. त्यांत मूळ काव्याचा, त्यांनीं भांडारकर संशोधन मंडळाच्या नियतकालिकांत (वर्ष १६ अंक –३,४) जो परामर्ष घेतला होता त्याचा हवाला अर्थातच आला. तसेंच त्यांत या काव्यांतले जटाशंकर आणि नंदुरबार या दोन बाबींचे लागूपुरते उतारे होते. हे उतारे वाचतांना पहिलीच गोष्ट प्रस्तुत लेखकाला खटकली ती म्हणजे या चरित्रनायक शंभुराजाचा बाप 'शिवाख्योदेशानामधिपति' हा नंदुरबारचाच होय. आणि त्यांचें हें नंदुरबार 'पुरं नदीद्वारं निखिल गुणसारं त्रिजगति' असून 'मुखानामाधारं भुवनवलये संविलसति' असें होतें व तेथले लोक 'सकलजन संतुष्ट मनसा' कवीला वाटले. तसेंच चरित्रनायक शंभूचा बाप 'शिवनृप' या मध्यें या हरिकवीला जें वैशिष्ट्य आढळलें तें म्हणजे तो 'रुचिरतनुभाज' होता तो इतका कीं त्याला पाहून 'सर्ववनिताः समुत्कीर्णाभित्ताविव समभवत्'। म्हणजे भिंतीवर काढलेल्या चित्रांसारख्या तटस्थ होत !

श्री. गोडे आणि बेंद्रे यांना या काव्याचा नायक संभाजी वाटला पण त्यामुळें नंदुरबार हा भाग निदान गांव तरी छत्रपतींच्या आधिपत्याखाली यांतल्या शिवाच्या वेळेपासून असल्याचा निर्देश आणि या शिवनृपाचें अप्रतीम सौंदर्य मुळींच खटकलें नाहीं. व या बापलेकांच्या अमलांत पुणें, रायगड इत्यादि स्थानें सोडा पण निदान त्यांचें नंदुरबार तरी मोगलांच्या चौफेर धाडींत स्वर्गातेंहि पैजा जिंके असें राहिल्याचा कवीचा मिळणारा निर्वाळा त्यांना विचारार्ह वाटला नाहीं. श्री. बेंद्रे यांनीं चंपाबरोबर या शंभूचें झालेलें लग्न तेवढें आपल्या ग्रंथांत स्वीकारार्ह ठरवलें व तेंहि श्री. गोड्यांच्याकडे बोट दाखवून. श्री. गोडे जर आधाराला घ्यायचे होते तर आणखी बऱ्याच गोष्टी त्यांनीं घ्यावयाच्या क्रमप्राप्त होत्या. जसें, 'पारिजातध्वज' म्हणजे भगवाझेंडा, भानुभट्ट ऊर्फ हरिकवीला हें शंभुराज चरित लिहिण्याची प्रेरणा देणार 'कृष्णपंडित' म्हणजे कविकुलेश ऊर्फ कलुशाकब्जी असून तो संभाजीचा गुरु होता. शिवाजीची भवानी तरवार संभाजीला मिळाली होती इ० परंतु या दोन्ही संशोधकांनीं या काव्यांतली जी माहिती त्याज्य ठरविली ती फक्त अनुल्लेखानेंच. हा अनुल्लेखाचा प्रकार श्री. गोड्यांनीं असा अनुसरला कीं तो विस्मयजनक वाटावा. उदाहरणार्थ भांडारकर संस्थेच्या त्यांच्या मूळ लेखांत त्यांनीं नंदुरबाराचा श्लोक गाळला आणि शिवसौंदर्य प्रशस्तीचा अर्धवट घेतला. 'गोद्विज... ...भक्ति' असा जो उतारा दिला तो मूळ 'भक्तिर्गोद्विज चंद्रचूडगुरुषु श्री शंभुराजास्तुते' असा आहे. आणि या काव्यांत आलेल्या व्यक्ति व स्थळांचीं नावें लेखाच्या शेवटीं देतांना नंदुरबार=नंदीद्वारपुर देण्याची गरज भासली नाहीं कारण त्या लेखांतच तें घेतलें नव्हतें.

नंदुरबारचे अधिपति कधींहि नसणारी छत्रपति पितापुत्राची जोडी यांत अभिप्रेत नसून नंदुरबारच्या देसायांच्या घराण्यांतल्या पुरुषांवर काव्य केल्याची प्रस्तुत लेखकाची कल्पना शिंदखेडे तालुक्यांतील पाटण येथील आशापुरी देवीच्या देवळांतील शिलालेखानें दृढ झाली. तो लेख असाः–

आशापुरी सकलकामपुरी जनानाम् ।
तस्या निकेतनमिदं त्वथ मंडपश्च ।।
नंदावतिस्थ शिवशंकरदास नाम्ना ।
देशाधिपेन रचितः खलुदेविप्रीत्यै ।।

संवत १७४४ प्लवंग नाम संवत्सरे आषाढ शु. १० भानु वासरे.

या लेखानें खात्री व्हावीच, पण पुन्हा माहिती-साठीं नंदुरबारच्या देसाई घराण्यांतले माझे एक शाळा-सोबती श्री. गोकुळशंकर शंकरदास देसाई यांच्या कडून त्यांच्या घराण्याची वंशावळ मागविली. तींत वैशिष्टय असें दिसतें कीं त्यांत पिढयांचीं नावें असून एकूण १९ नांवें आहेत. त्यांतलें पहिलें मूळ पुरुषाचें कानजी वगळलें तर बाकी सर्व शंकरा-चींच पर्यायात्मक नांवें आहेत. जसें:– शिवदास, शिव-शंकरदास, सदाशिवदास, हरलोचनदास, शंभूदास, शंकरदास, शिवलोचनदास, त्रिलोचनदास, शिवलालदास हरचरणदास इत्यादि; यांत शिवदास–शंभुदास आणि शिवशंकरदास–शंभुदास अशा पितापुत्रांच्या दोन जोड्या आहेत. यातली कोणती जोडी या चरित्रांत अभिप्रेत आहे याचा निकाल तात्पुरता, महत्वाचा न मानतां हें चरित्र छत्रपतीचें नसून नंदुरबारच्या एका शंभूदास देसायाचें आहे हा मुद्दा अगत्याचा वाटून ' ए नोट ऑन मि. गोडेज् हिस्ट्री आफ् दि जटाशंकर टेंपल् ॲट नंदुरबार ' हा लेख मुंबई विद्यापीठाच्या नियतकालिकांत जुलई १९४६ ( वर्ष १६ भाग १ ) यांत दिला. यांत पहिला आक्षेप मी मांडला तो हा कीं, शिवाजी व संभाजी नंदुरबारचे राजे म्हणून तेथें कधीं रहात होते काय; अर्थात यांतले शिवशंभु पितापुत्र हे छत्रपती समजण्यांत श्री. गोडे यांचा कयास कच्चा आहे. हे पितापुत्र तेथले देसायां-पैकींच होत.

पुढें कांहीं कामानिमित्त नंदुरबारला गेलों असतां तेथें देसायांच्या घराण्यांत कांहीं कागदपत्र मिळतात कां म्हणून तपास केला. तपासासाठीं श्री. गोडे यांचा आणि त्यावरचा माझा लेख यांचा चांगला उपयोग झाला व देसायांपैकीं ज्यांच्या घरीं जुन्या कागदांचा अधिकांश संग्रह होता ते श्री. शिवलालदास संभुभाई ऊर्फ राजाजी देसाई जहागीरदार यांची गाठ झाली. माझ्या लेखानें जादू केली व त्यांचें सर्व दप्तर चाळून त्यांतून साधारण ५०० कागद मोडींतले राजवाडे मंड-ळांत नकला करण्यासाठीं आणले. श्री. देसाई यांनाहि कागद वाचण्याची चटक लागली आणि त्यांनीं एक जुन्या जमाखर्चाची वही मला दाखविली. तिच्यांत भानुभट ( हरिकवि ), किशनभट ( म्हणजे श्री. गोडे यांना भासलेला कविकुलेश ) इत्यादींना वेळोंवेळीं दक्षणा, बिदागी, संभावना इ० या देसाई कुटुंबानें देकार दिल्याचे मित्तीवार उल्लेख आढळले. इतकेंच नव्हे तर या काव्यांतली चंपा ही " नानी बहु " म्हणून उल्ले-खित दिसत असून तिला प्रथमच सासरीं आणण्यासाठी रक्कम खर्ची पडल्याचा उल्लेख त्यांत होता.

याच संधीला या प्रकरणाला गुजराथेंतून दुजोरा मिळाला. माझा इंग्रजी लेख वाचून डॉ. मं. र. मुजुमदार, बडोदें विद्यापीठांतील गुजराथीचे प्रमुख प्राध्यापक यांना ' रणयज्ञ ' या काव्याचा कर्ता प्रेमानंद याच्या आश्रयदात्याचा शोध लागला. ' रणयज्ञ ' लिहिण्यासाठीं ' मेहता शंकरदासे मुझनें आज्ञा आपी जी ' म्हणजे मेहता शंकरदासानें मला आज्ञा केली असें तो म्हणतो. हा कवी मूळ बडोद्याचा पण पोटा-साठीं नंदुरबार, ब्हाणपुराकडे आल्याचा त्याचा उल्लेख होताच. नंदुरबारच्या देसायांतला शंभुदासाचा भाऊ शंकरदास त्यांना हा आश्रयदाता आढळला.

श्री. देसाई यांच्या धुळ्यास कामानिमित्त होणाऱ्या फेरींत त्यांचा मुक्काम होऊन या व अन्य विषयावर चर्चा होऊं लागल्या. नंतर आपल्या घरचें हें नवें साहित्य व माझा लेख असे घेऊन ते श्री. गोड्यांना प्रत्यक्ष भेटले व त्यांच्या मदतीनें शंभुराजचरिताचा ग्रंथच प्रत्यक्ष भांडारकर संस्थेंतून घेऊन आले. त्यांची आवड पाहून या नव्या साहित्याचा उपयोग करणारा असा एक विस्तृत लेख ' शंभुराज चरिताचा नायक



अनुक्रमणिका

कोण ? ' संशोधकाच्या १६ व्या वर्षाच्या जोड अंकांत त्यांच्या कडूनच लिहून दिला. त्यांच्या घराण्याशींच या वादाचा संबंध येत असल्यानें त्यांनीं श्री. गोड्यांच्या मूळ भांडारकर सं. च्या नियतकालिकांतल्या लेखांत आलेल्या श्लोकांतील 'अग्रजो यस्य भ्राता जयति महितः शंकर इति' ही फोलि. २३५/२ वरील ओळच नजरेस आणली. त्यांच्या घराण्याची त्यांनीं जी वंशावळ जुन्या कागदपत्रांतून नकलून दिली त्यांत शंभुदासांचा भाऊ मोठा शंकरदास नमूद आहेच. नंदुरबारच्या कागदांत प्रस्तुत लेखकास या प्रश्नाचा कायमचा निकाल लावणारा पुरावा पुढें आला असें वाटलें व अद्यापहि वाटत आहे.

त्या देसाई घराण्याच्या दप्तरावर एक टांचण मी हिस्टारिकल रेकर्डस कमीशनच्या १९५४ च्या वार्षिकांत दिलें त्यांत नमुना म्हणून पांच कागदांचा त्रोटक परिचय दिला. त्यांत कागद नं. ७१ हा '**हकीकत फौजदारान व जागीरदारान प्रगणे नंदुरबार**' हा असून त्यांत फसली ९९४ ते फसली ११६४ पर्यंतच्या म्हणजे साधारण इ. सन. १५८४ ते १७५४ पर्यंतच्या नोंदी आहेत. यांत औरंगजेब ( १०४९ ते १०५१ ), मुरादबक्ष ( १०५६ ), शायस्तेखान ( १०५७ ते १०५९ ), रफिउश्शान ( १११८ ते ११२१ ) अशीं नावें व पुढें वर्षें फसलीं दिलीं आहेत. त्यांत देसाई घराण्याच्या मुख्य पुरुषांच्या मृत्युतिथीहि आहेत. त्यांत चरित्र नायक 'शंभुदास देसाई नाश पाम्या' असा शेरा आहे. वर्ष मला आठवत नाहीं. देसायांच्या लेखाच्या वेळीं या कागदाकडे लक्ष गेलें नव्हतें. ते कागद पाहून, निवड व नकला पुढें केल्या. या कागदाचा मुद्दाम निर्देश करण्याचें कारण यांत जे विविध अधिकारी आले आहेत त्यांत शिवाजी व संभाजी असा कुठेंहि कोणत्याहि अधिकाराच्या संदर्भात उल्लेख नाहीं. मधें एक राजा मकरंद ( १०८१ ते १०८२ ) अशी नोंद आढळते.

श्री. बेंद्रे यांच्या पुस्तकांत चंपा प्रकरण अशा थाटांत आलें आहे कीं जेव्हां संभाजी बापावर रुसून मोगलांकडे गेला होता त्या अवधीत हा बनाव घडला. जर त्या संधीत हें संभाजीचेंच लग्न झालें असें गृहीत धरलें तर नंदुरबारचा राजा म्हणवणारा तो त्याला नंदुरबारची मनसब–जाहागीर–सरंजाम असें कांहीं तरी मिळावयास हवें, त्याचा उल्लेख त्यांत यावयास पाहिजे होता तसा आढळत नाहीं. **संभाजीचें दुसरें लग्न झालें होतें काय या प्रश्नाऐवजी नंदुरबाराचा भाग शिवाजी व संभाजी यांच्या सत्तेखाली कधीं आला होता काय** ? असा मूलभूत प्रश्न जर श्री. गोडे यांनी चर्चेला व चौकशीला घेतला असता तर या काव्यावर वाढलेल्या त्यांच्या विविध लेखांना मूळच धरतां आलें नसतें.

या काव्याचें दुसरें नांव हैहयेंद्रचरित आहे व या दोघांत एकच शंभुराज वर्ण्यविषय आहे हें श्री. गोडे मान्य करतात नव्हे शोध म्हणून देतात. 'हैहय' हें नांव गुजराथच्या कांहीं भागास होतें यावरून या चरित्रनायकाचा गुजराथी तोंडवळा स्पष्ट होतो आणि यांत चरित्रकार हरिकवि स्वतःला 'दक्षिणान्वय' म्हणजे दक्षिणी पंडित असल्याचें नमूद करतो. संभाजीच्या दरबारांत या जातवारीचें प्रयोजन कितपत भासावें ?

या शंभूचा 'पारिजातध्वज' हा मराठ्यांचा भगवा झेंडा आहे असा एक निष्कर्ष श्री. गोडे यांनीं काढून तो सजवतांना पारिजाताचें बोटॅनिकल नांव, नंतर खेडा जिल्ह्यांत पारिजातकाच्या दठापासून भगवा रंग करतात इत्यादि माहितीचा संभार उभा केला. त्यांत मराठी पत्रांतून तेल, गेरू, खादी यापासून झेंडा कसा रंगवीत हाहि उतारा दिला. पण भगवा झेंडा पारिजात ध्वज या नांवानें अन्यत्र कोठें निर्देशिल्याचें त्यास सांपडलेलें दिसत नाहीं.

पारिजाताचा ठळक संकेत म्हणजे पांढरा व तांबडा रंग जोडीनें येणें. देसायांचा झेंडा असा तांबड्या व पांढऱ्या पट्ट्यांचाच होता. स्वराज्यप्राप्तीनंतर तेहि त्या जागी भारतीय ध्वज लावतात.

हें घराणें नंदुरबार सरकार या विभागाचे सरकानुगो म्हणून जवळ जवळ तीनशें वर्षें सतत नांदत होतें. या सरकारांत आजच्या धुळें जिल्ह्यांतील साधारण अर्धा-भाग येत असे. इंग्रजींत त्यांना नोकरी न करतां तीन गावांची जहागीर चालू ठेवून रु. १४००० नक्त नेमणूक देण्यांत आली. नंदुरबारला त्यांचा भव्य वाडा रंगमहाल नांवानें अद्याप असून त्यांतले लोक विविध

उद्योग व व्यापार करतात, शिंदखेड्यासहि त्यांच्या पेढया पूर्वी पासून आहेत.

हें घराणें जातीनें दशा पोरवाड व आज वल्लभ संप्रदायी असलें तरी पूर्वी तें शैव होतें असें म्हणतात. त्याचा पुरावा म्हणजे त्यांच्या नांवांत शिवाच्या नांवाचाच पर्याय अद्यापहि येतो आणि त्यांच्या रहात्या वाड्यांत नित्य पूजेसाठीं छोटीं शिवमंदिरें आहेत. नुकतेच निवर्तलेले एक वृद्ध गृहस्थ कपाळावर चांगलें ढळढळीत आडवें गंध लावीत. त्यांनीं त्यांच्या घराण्यांतील शिवपूजेला वैष्णव समाजाचा पूर्वी विरोध झाल्याचेंहि सांगितलें पण सत्ता आणि संपत्तीच्या बळावर तो मूळ धरूं शकला नाहीं. आणि ते वैष्णव म्हणवून राजरोस कपाळभर आढवें गंध लावीत. या शैवभक्तीच्या संदर्भांत वर उल्लिखित 'भक्तिगोंद्विजचंद्रचूड गुरुषु' यांतील 'चंद्रचूड' या पदावर प्रकाश पडतो. याचा अर्थ तो चरित्रनायक गाय, ब्राह्मण, महादेव आणि गुरु यांची भक्ति करणारा होता.

या विषयावर पुष्कळच लिहितां येण्यासारखें आहे पण आणखी एक या काव्याच्या चरित्रनायकाच्या आयुष्यांतली घटना नमूद करतों. ती म्हणजे या शंभूदास देसायला उत्तर आयुष्यांत आपलें सरकानुगोपद व जहागिरी राखण्यासाठीं मुसलमान व्हावें लागलें होतें या गोष्टीचा उल्लेख इनामकमीशनपुढें या घराण्यानें सादर केलेल्या कैफियतींत प्रथम मला आढळला व नंतर या घराण्याच्या फार्सी कागदांची-पहाणी करतांना 'घुलीं' या गांवाच्या सनदेंत '**अबदुल मोमीन ऊर्फ शंभुदास देसाई**' असें याचें जोड नांव आढळलें. त्या संधीला खानदेशांत राऊळ, देशमुख, पाटील, देशपांडे, गिरासिये अशा वतनदार घराण्यांतून असें धर्मांतर ही एक अनिवार्य बाब झाली होती व आज या धर्मांतरित शाखांचा कुठें कुठें विस्तार झालेला आढळतो. पण उपरोक्त शंभुदासाचें धर्मांतर त्या व्यक्तिपुरतेंच मर्यादित होतें येवढें मात्र दिसतें.

या चंपाविवाह प्रकरणाला श्री. बेंद्रे यांच्या संभाजी चरित्राच्या परीक्षणाच्या ओघांत श्री. नरहर कुरुंदकर यांनीं मराठवाड्याच्या १९६० गेल्या दिवाळीच्या अंकांत प्रथम चालना दिली. त्यांनी संशोधकांतील देसायाच्या लेखाचा निर्देश केला. तर श्री. टिकेकरांच्या संभाजीचरित्राच्या परीक्षणांत पुन्हा या प्रश्नानें डोकें वर काढलें व नवभारताच्या मार्च १९६१ च्या अंकांत नवभारताच्या संचालकांनीं प्रस्तुत लेखकाचा अशा शब्दांत हवाला दिला की त्यावर नवभारताच्या वाचकांपुढें हा चंपाविवाहाचा प्रश्न साद्यंत मांडणेंच युक्त व्हावें. श्री. गोडे व बेंद्रे यांच्या सारख्या दीर्घ व व्यापक व्यासंगी संशोधकांशीं भिन्नमत प्रदर्शित करण्यांत माझी भूमिका कितपत यथार्थ आहे हें ठरविणें वाचकांवर सोपवून तूर्त रजा घेतों.










प्रा. सदाशिव आठवले

# आद्य नास्तिकाची शोकांतिका

बुद्धिवाद कांहीं नवीन नाहीं. निरीश्वरवाद; पौरोहित्याला, कर्मकांडाला विरोध ह्या आणि ह्यासारख्या विचारपद्धति आणि तदनुरूप आचार हा अमुक शतकांतच, तमुक परिस्थितींतच झाला पाहिजे असा ' कायदा ' नाहीं. अत्यंत प्राचीन काळीं एखादा तर्कशुद्ध विचार करणारा नास्तिक होऊन गेला असें प्राचीन वाङ्मयांतून आढळलें तर त्याची काळजीपूर्वक दखल घेतली पाहिजे.

असा एक नास्तिक प्राचीन भारतांत होता. एका देशाचा राजाहि होता तो. त्याचें नांव वेन.

वेनाच्या जीवनाचे आणि कार्याचे तपशील मुख्यतः निरनिराळ्या पुराणांतून मिळतात. वैदिक वाङ्मयांतहि त्याचें नांव येतें; पण विशेषसें कांहीं हातीं लागत नाहीं. कीथ आणि मॅक्डोनेल सारखे विद्वान ह्याला ऐतिहासिक व्यक्ति मानायलाही कचरत आहेत.[१] इथें अर्थातच हें स्पष्ट करून ठेवलें पाहिजे कीं वेदब्राह्मणांतून वेनाचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष उल्लेख असला तरी त्याचें चरित्र पुराणांवरूनच तयार करावें लागेल. ज्यांना पुराणें हीं सर्वस्वी त्याज्य वाटतात, त्यांत इतिहासाचा अंशहि नाहीं, केवळ सुरस आणि चमत्कारिक गोष्टी आहेत असा ज्यांचा सिद्धांतच असेल त्यांनी हा लेख ह्याच्यापुढें वाचूं नये. इतिहास म्हणून पुराणांना अर्थ आहे कीं नाहीं हा वाद फार जुना आहे. कर्नल केनेडी सारख्यांनी पुराणांना जनतेला धार्मिक शिक्षण देण्यासाठीं ' रचलेल्या ' गोष्टी ह्यापलीकडे अधिक महत्त्व देण्याचें नाकारलें[२]; तर एच्. एच्. विल्सन, पार्गिटर वगैरे विद्वानांनी भारताचा प्राचीनतर आणि प्राचीनतम इतिहास पुराणांतूनच गोळा केला पाहिजे असें निक्षून सांगितलें[३]. ह्या ठिकाणीं ह्या मुद्याची फार चर्चा करायला जागा नाहीं. तथापि एवढें लक्षांत घेतलें पाहिजे कीं कथा-कीर्तनकारांनीं, भटाभिक्षुकांनीं पुराणांत जो ' शिमगा ' ( इति लोकहितवादी ) केला असेल तो वगळावा, मागें उरणारें कवित्वहि टाळावें आणि इतिहास निवडून, टिपून, वेंचून घ्यावा—सोईचा वाटेल तेवढाच नाहीं तर सगळाच ! केवळ नाणीं आणि शिल्पलेख नाहींत म्हणून हात हलवीत बसण्याचें कारण नाहीं. तारतम्य वापरून आज पुराणांतून मिळतें तेवढें नोंदून ठेवावें, पुढें दुसरे पुरावे उपलब्ध होतील त्यानुसार तें घ्यावें किंवा फेकावें.

## वेनाची हकीकत

विष्णु, भागवत, पद्म वगैरे पुराणांतून वेनाची हकीकत सांगितली आहे ती अशीः—

---

१. " a semimythical personage ... a cultural hero rather than a real person. " Vedic Index II. [ ऋग्वेदांत जो वेन आहे [ १०–९३–१४ ] तो आणि पुराणांचा वेन [ वायु. २.१; भागवत. ४।१४; मत्स्य. १०; विष्णु. ४।१३ इ. ] एकच असतील असें नाहीं. तथापि संहितांतून आणि ब्राह्मणांतून [ ऋ. ८–९–१०; १०–१४८–५; पंचविंशति ब्रा. ११।७।५।१ इ. ] वैन्य पृथु भेटतो. तो आणि पुराणांचा पृथु [ विष्णु. १।१३ इ. ] निश्चितपणें एकच ]

२. Wilson— Preface to the translation of Vishnu Purana pp. X–X III.

३. Pargitar – Ancient Indian Historical Traditions.









अनुक्रमणिका

स्वायंभुव मनु वंशांतील अंगराजाचा पुत्र वेन हा स्वभावतःच दुष्ट होता. अंगराजानें आपल्या गादीच्या वारसाला सुधारण्याचा 'आटोकाट यत्न केला, पण व्यर्थ.[४] मग राजा स्वतःच वैतागानें एका रात्री अज्ञात प्रदेशांत निघून गेला. राजा नसल्यामुळें सर्वत्र अव्यवस्था माजली. अशा परिस्थितींत ऋषींना नाइलाजानें वेनाचें पूर्वचरित्र माहीत असतांनाहि त्याला अभिषेक करावा लागला[५]. आणि कितीहि दुर्गुणी असला तरी वेन राज्यकारभार मात्र खंबीरपणें पाहूं लागला. चोराचिलटांचा बंदोबस्त करून त्यानें प्रजेला शांतता आणि सुव्यवस्था दिली[६]. तथापि परम दुःखाची गोष्ट अशी कीं हा वेदवचनें मानीना, राज्यांत वेदाभ्यास बंद झाला; यज्ञयाग बंद झाले; देवतांना सोमरस मिळेनासा झाला ! त्यानें वटहुकूम काढले; "यज्ञ करायचे नाहींत, दान द्यायचें नाहीं, आहुत्या स्वीकारण्याऱ्या देवता कोण ? मी हजर आहे; काय द्यायचें तें मला द्या." ऋषींनी हात जोडून राजाला म्हटलें, "राजा, देवांचा अधिपति, यज्ञांचा स्वामी अशा त्या हरीसाठीं आम्हीं दीर्घसत्र करणार आहोंत. त्यानें तुझें, तुझ्या राज्याचें, तुझ्या प्रजेचें कल्याण होईल. ज्याच्या राज्यांत यज्ञयाग होतात त्याच्यावर हरि सर्व प्रकारच्या वैभवाचा वर्षाव करतो." वेन राजानें उत्तर केलें "हा हरी कोण, कुठला ? शाप किंवा वर देण्याचें सामर्थ्य माझ्यांत आहे. माझ्या राज्यांशी कुठल्या देवाचा काय संबंध ? हें जाणून तुम्हीं माझ्या आज्ञा मानाव्या हें बरें." ऋषींनीं पुन्हां विनविलें, "राजा, परवानगी दे. धर्माचा नाश होऊं देऊं नकोस. धर्म संपला म्हणजे हें सारें विश्वहि संपलेंच !"

वेन कांहीं केल्या वळेना. मुनि चिडले, संतापले आणि त्यांनी गर्दी करून राजाच्या अंगावर धावून जाऊन त्याला ठार केलें.

वेनाचा कांटा काढला, पण नवीनच प्रश्न उद्भवला. देशांत अराजक माजलें. दक्ष शास्ता गेल्याबरोबर लोक मोकाट सुटले. चोऱ्या, दरोडे, अत्याचार राजरोस होऊं लागले. मग मुनिवर्य पुन्हां एकत्र जमले. त्यांनी वेनाचा पुत्र पृथु ह्याला राज्याभिषेक केला. पृथूच्या धर्मनिष्ठेनें, सत्कृत्यांनीं प्रजा संतुष्ट झाली; एवढेंच नव्हे पापी वेनालासुद्धां स्वर्गांत स्थान मिळालें ![८]

## वेनाची भूमिका बुद्धिवाद्याची होती

ही पुराणांतर्गत कथा अर्थातच तपासून घेतली पाहिजे, तिचा तर्कशुद्ध अर्थ लावला पाहिजे.

सर्व पुराणें एका सुरांत सांगतात कीं वेन व्रात्य होता. अनन्वित अत्याचार करणारा तो एक नरराक्षस होता. परभार्यापहरण करण्यापर्यंतहि त्याची मजल होती[९]. पद्मपुराणाप्रमाणें म्हणजे ऋषिमुनींना मानवजातीसंबंधींचें आपलें नैतिक कर्तव्य म्हणूनच

४. भागवत पुराण ४।१३।४०-४२

५. कित्ता ४।१४।१-२

६. कित्ता ४।१४।३

७. हरिवंश ५

८. विष्णुपुराण १।१३.

(विष्णु व इतर पुराणांतून गोळा केलेली हकीकत इथपर्यंत जवळजवळ जशीच्या तशी पण सारांशानें दिली आहे. मात्र ऋषींनी दर्भाच्या पातींनी वेनाला कापलें, वेनाच्या मांडीतून पृथु निघाला वगैरे अद्भुत गोष्टी सांगितल्या नाहींत.)

९. पद्म. पुराण सृष्टिखंड ८।५१; ब्रह्मपुराण १।७८








केवळ वेनाविरुद्ध मसलत करावी लागली[१०]. पुराणांनी सांगितलेली वेनाचीं दुष्कृत्यें समर्थनीय नाहींत; तथापि वैदिक धर्माविरुद्ध उभ्या ठाकलेल्या वेनाची कृत्यें पुराणांनी वाढवून, फुगवून, अतिरंजित करून सांगणें स्वाभाविकच आहे. परंतु गादीवर आल्याबरोबर वेनानें राज्यांत हिंसा, लूटमार थांबवून सुव्यवस्था निर्माण केली असें पुराणेंच सांगतात.[११] आणि पुढें त्याचा खून झाल्यानंतर ताबडतोब राज्यांत पुन्हां गोंधळ आणि दहशतवाद माजला हेंहि सांगणें पुराणांचेंच ![१२] ह्यावरून निश्चित असें दिसतें कीं सर्वसामान्य प्रजाजनांसाठीं वेनानें खंबीरपणें उत्तम राज्यकारभार केला. हें करण्यासाठीं कायद्यांची अंमलबजावणी ह्या राजाला फार कडकपणें, निष्ठुरपणें करावी लागली असावी. वेनामध्यें व्यक्तिशः कांहीं दुर्गुण असतीलहि; परंतु तो शासक म्हणून फार कर्तबगार होता असा पुराणांचाच अभिप्राय आहे. अशा न्यायनिष्ठुर माणसाविषयीं गैरसमज होतात—आणि मुद्दाम पसरविलेहि जातात !

वेनाचा त्याच्या काळांतील कर्मकांडात्मक धर्माला सडकून विरोध होता. त्याला यज्ञ मान्य नव्हते. पुरोहितवर्गाला त्यानें थारा केला नाहीं. त्यांच्याकडून मार्गदर्शनाची किंवा आशीर्वादांची अपेक्षा केली नाहीं. पद्मपुराणांतील तर्कट असें कीं राजानें हें जैन साधूंच्या नादीं लागून केलें;[१३] तर विष्णुधर्मोत्तर पुराणाचा आरोप असा कीं लोकायतिकांनीं राजाचे कान फुंकल्यामुळें हें असें झालें.[१४] इथें पुराणांनी कालानुक्रमाचा गोंधळ केला आहे तो अगदीं उघड आहे. वेन हा इ. स. पूर्व तिसऱ्या सहस्रकांतला.[१५] जैन, चार्वाक हे शेंकडो हजारों वर्षें नंतरचे. वेदविरोध ह्या एकाच मुद्यावर पद्मपुराणकारांना वेन जैनांसारखा वाटतो. पण जैनांचे सगळे विचार, आचार लक्षांत घेतले तर प्राण गेला तरी वेन जैन झाला नसता हें जाणत्यांस उलगडेल. विष्णुधर्मोत्तरकर्त्यांना वेनाची भूमिका चार्वाकांसारखी वाटली तें अधिक बरोबर दिसतें.[१६]

वेनाची भूमिका बुद्धिवाद्याची होती. यज्ञकर्मांतील निरर्थकता त्याला समजली. पुरोहित वर्गाच्या लांड्यालबाड्या त्यानें ओळखल्या. सामान्य माणूस अज्ञानानें बळी जात होता, हें त्यानें पाहिलें. राजा म्हणून त्याचें हित पहाणें आपलें कर्तव्य आहे अशी त्याची भावना होती. म्हणून दीर्घसत्रासारखे प्रकार तो चालूं देईना. त्या सत्राला हातभार लावणें हें राजाचें कर्तव्य आहे हें तर त्याला अजिबात पटत नव्हतें. राज्यांत शांतता असणें, स्थैर्य असणें; प्रजा सुरक्षित, सुखी असणें एवढें झालें कीं राजाचें काम संपलें. आणि प्रजेनें राजाज्ञा मानावी, राजऋण फेडावें, माणसाला क्रान्तिऋण, देवऋण असें दुसरें तिसरें कांहीं असूं शकत नाहीं, अशाप्रकारें वेनराजा आपल्या प्रजेला इहलोकपर जीवनमार्ग

१०. कित्ता.

११. भागवत. ४।१४ इ.

१२. कित्ता.

१३. पद्म. भूमिखंड ३८।२

१४. विष्णुधर्मोत्तर १०८।६–१८

१५. पुराणांतील वंशावळयांच्या आधारें–

१६. विष्णुधर्मोत्तरांतील वेनाचे तोंडी घातलेले विचार आणि शंकर, माधवासारखे ब्राह्मण, कमलशीलासारखे बौद्ध, गुणरत्नासारखे जैन ह्यांचीं लिखाणें ह्यांचें तौलनिक वाचन करून पाहाण्यासारखें आहे.

दाखवीत होता. त्यांना वास्तव जीवन जगायला सांगत होता. ह्या राजानें सर्वसामान्य प्रजाजनांच्या सुखासाठीं चोरांप्रमाणें ब्राह्मणांचा बंदोबस्त करणेंहि आवश्यक आहे हें जाणलें. हें एक वैचारिक बंड होतें आणि तें खुद्द एका राजानेंच आपल्या प्रजाजनांपैकीं कांहीं लब्धप्रतिष्ठितांविरुद्ध पुकारलें होतें !

परंतु वेन आपल्या अंगीकृत कार्यांत अयशस्वी झाला. ऋषींच्या एका टोळक्यानें राजावर प्राणांतिक हल्ला केला. वेना बरोबरच त्याचें कार्य संपलें. वेनाचा मुलगा पृथु ह्याच्या कारकीर्दींत ऋषींनी उट्टें फेडून घेतलें. कर्मकांडांना महापूर आला. पृथूला पहिला अभिषिक्त राजा म्हटलें गेलें. त्याच्या गुणगौरवासाठीं संस्कृत शब्दसंग्रहाची नुसती उधळपट्टी झालेली आहे ![१७]

## वेनाचा पंथ मात्र अगदी निराळा

वेनानें सत्रें वगैरे बंद करण्याचे हुकूम काढले; पण नहुष राजाप्रमाणें ब्राह्मणांचीं डोकीं उडविण्याचा कार्यक्रम हातीं घेतलेला दिसत नाहीं. नहुषावर आग पाखडणारीं पुराणें[१८] वेनानें तसें कांहीं केलें असतें तर त्याला काय म्हणून मोकळी सोडतीं ? परंतु पुराणांतून तसें अप्रत्यक्ष सुचविलेलें सुद्धां दिसत नाहीं. तेव्हां वेन हा ब्रह्मद्वेषी नाहीं. ब्राह्मण वर्णाचा नायनाट करायला प्रवृत्त झालेला नाहीं. तो कर्मकांडाधिष्ठित धर्माला विरोध करीत आहे.

प्राचीन कांळातील ब्राह्मणक्षत्रिय स्पर्धेतील क्षत्रियांच्या बाजूचा, एका कालखंडांतील, एक मोठा पुढारी म्हणून कधीं कधीं वेनाला संबोधण्यांत येतें[१९]. पण ह्यांत वेनावर विलक्षण अन्याय होत आहे. अशा दृष्टीनें पाहिलें, तर वेनाच्या जीवितकार्याचा खरा अर्थ समजूच शकणार नाहीं. नहुष राजा ब्राह्मणांकडून जबर कर वसूल करायचा, त्यांच्या पाठींवर बसून त्यांना पशूंसारखें वागवायचा[२०]. ही सरळ सरळ सूडबुद्धि आहे. हा एक प्रकारचा क्षुद्र असुरी आनंद आहे. निव्वळ वर्णद्वेष आहे. पुरूरव्यासारख्या आणखी कांहीं क्षत्रिय राजांनीहि असें नीच राजकारण केलें. निमीसारख्या आणखी कांहीं क्षत्रिय राज्यांच्या औधत्याविषयींहि पुराणें ओरडतात. पण निमीचा अपराध एवढाच कीं कुलगुरूला डावलून यज्ञासाठीं दुसऱ्याच एका पुरोहिताची त्यानें नियुक्ति केली.[२१] वसिष्ठादि ब्राह्मणांविरुद्ध विश्वामित्रानें दंड थोपटले; पण कशासाठीं ? स्वतःला द्विजत्व मिळावें म्हणून ! आणि शेवटीं तें मिळवून तो धन्य झाला !![२२] ब्राह्मणक्षत्रिय वादाच्या अशा तऱ्हा तऱ्हा होत्या. वेनाचा पंथ मात्र अगदीं निराळा दिसतो. तो मुळांत घाव घालतो आहे. ब्राह्मणवर्णांत जन्म घेतला म्हणून तो कोणास फाशी द्यायला सज्ज झालेला नाहीं. ब्राह्मणत्व ही कांहीं तरी महान गोष्ट आहे आणि ती आपल्याला मिळाली पाहिजे अशी विश्वामित्रासारखी विचित्र जिद्दहि त्याचेकडे नाहीं. त्याच्या दृष्टीनें विश्वामित्राची महत्त्वाकांक्षा मूर्खपणाची आहे. तो धर्मसंस्था, यज्ञसंस्था, पौरोहित्यसंस्था ह्याविरुद्ध बंड पुकारून उभा आहे. आपल्या नव्या कल्पनानुसार राज्य करण्याचा त्यानें प्रयत्न केला. आपल्या नव्या तत्वज्ञानासाठीं तो जगला आणि त्याचसाठीं मेला.

---

१७. शतपथ ब्राह्मण ५।३।५।४ ; काठकसंहिता ३७।४; पुराणें वगैरे.

१८. वायुपुराण, महाभारत–उद्योगपर्व वगैरे.

१९. Original Sanskrit Texts, Vol. I,. Muir. pp. 297

२०. वायुपुराण. १८०

२१. भागवत ९।१३।१–१३

२२. रामायण, महाभारत, भागवत, हरिवंश वगैरे.



अनुक्रमणिका








अनुक्रमणिका

श्री. ना. ब. जोशी

# शिवगीतेचा संस्कृत टीकाकार अय्याजी भट्ट

विजापुरांतील जुम्मामशीद पेठेंत राहणाऱ्या राय जोशी घराण्यांतील जुन्या पोथ्या व गळाठे पहात बसल्यावेळीं शिवगीतेची एक उत्कृष्ट पोथी मिळाली. इतर बहुतेक पोथ्या उध्वस्त झाल्या असून जवळ जवळ कोणतीहि पोथी पूर्ण नाही म्हटलें तरी चालेल. हें राय जोशी घराणें आदीलशाहीपासून प्रसिद्ध आहे. या घराण्यांत विद्वान् मंडळी होऊन गेली. ज्योतिषी म्हणून हें घराणें प्रसिद्ध होतें. या घराण्यांत फार मोठा संस्कृत व कांहीं मराठी ग्रंथाचा संग्रह होता. परंतु आज तिथें पन्नास पाऊणशे व तेहि बहुतेक त्रुटित ग्रंथ उरले आहेत. या अशा संग्रहांत ही शिवगीतेवरील टीकेची पोथी सुव्यवस्थित, पूर्ण व उत्तम रीतीनें लिहिलेली मिळाल्यानें फार आनंद झाला. ही वाचून पहातां हिचा संस्कृत टीकाकार अय्याजी मेधावी अथवा अय्याजी भट्ट असून ती टीका त्यानें शके १७२२ मध्यें आपला गुरु ज्ञानानंद याचें इच्छेवरून वीरापूर मुक्कामी लिहिल्याचें आढळलें.

या अय्याजी विषयीं जास्त कांहीं माहिती मिळते काय तें पाहण्याच्या दृष्टीनें श्री. ग. ह. खरे यानां लिहिलें व त्यानीं ताबडतोब कळविलें कीं या अय्याजी मेधावीच्या टीकेच्या पांच सहा प्रती देशांत उपलब्ध आहेत. त्यानंतर डॉ. पी. के. गोडेनां लिहिलें व त्यानींहि अविलंबें उत्तर पाठविलें कीं या शिवगीतेच्या टीकेची एक प्रत भांडारकर इंस्टिट्यूट मध्यें असून ती अभ्यासाकरितां पाहिजे असल्यास मजकडे पाठविण्याचीहि तयारी दर्शविली. त्यांच पत्रांत त्यानीं लिहिलें होतें कीं ऑफ्रेटनें या टीकेची नोंद केली असून हॉलनें बनारस हस्तलिखितांच्या सूचींत पान १२३ वर थोडी माहिती दिली आहे. ती अशीः "हा टीकाकार वीरापूर अथवा बीरापूर येथील व हें वीरापूर गुजरातेंत असावें. टीकाकारानें आपल्या गुरूच्या आज्ञेवरून ही टीका लिहिली." डॉ. गोडेनीं आपल्या पत्रांत असें लिहिलें होतें कीं दोन गोष्टींचा नीट उलगडा व्हावयास पाहिजे; एक वीरापूर गांव व दुसरें अय्याजीचा गुरु ज्ञानानंद. त्याप्रमाणें एकंदर अभ्यास करतां व शोध घेतां मला जें आढळलें तें मी आज आपल्यापुढें विचारार्थ ठेवीत आहे. तत्पूर्वी श्री. ग. ह. खरे व डॉ. पी. के. गोडे यांचे त्यानीं तत्परतेनें माहिती पाठविल्याबद्दल व संशोधनाची दिशा दाखविल्याबद्दल आभार मानणें माझें कर्तव्य आहे.

विजापुरांतील जुन्या ब्राह्मण घराण्यांत राय जोशींचें घराणें विद्वत्तेबद्दल व उत्तम ज्योतिषी म्हणून प्रसिद्ध आहे. हें या गांवीं निदान साडेतीनशें चारशें वर्षें तरी राहात आहे. हें देशस्थ, स्मार्त, भारद्वाज गोत्री घराणें. या घराण्यांतील कागदपत्रें आतां मिळणें फार कठीण झालें आहे. वेळोंवेळीं भाऊबंदकीमुळें व कर्ते पुरुष गेल्यानें ग्रंथ व कागदपत्रें यांची वाताहात झाली आहे. तरी पण जे उरले आहेत त्या ग्रंथांच्या शेवटीं प्रती करून घेणाऱ्याचा नांव, शक वगैरे माहितीवरून व गळाठ्यांत सांपडलेल्या पत्रांच्या व फिर्यादी, तंटे, हिशोब वगैरे कागदांच्या व नकलांच्या आधारें जेवढी माहिती हातीं आली त्यांतील या विषयांस जरूर ती माहिती येथें देतों.

शिवगीतेच्या सुबोधिनी टीकेमध्यें टीकाकारांचें अय्याजी हें नांव स्पष्ट आहे व नांवावरून हा गृहस्थ कानडी प्रांतांतील असावा अशी शंका ऑफ्रे अथवा हॉल यांस यावयास पाहिजे होती व त्यास गुजरातेंतील कोणत्या तरी वीरापूर अथवा बीरापूर समजण्यापूर्वी थोडी चौकशी व्हावयास पाहिजे होती, पण त्यावेळची माहिती व सवड पहातां तें त्याना शक्य नव्हतें असें दिसतें.

मी केलेल्या शोधावरून ज्या जोशी घराण्याचा मी वर उल्लेख केला आहे त्याच जोशी घराण्यांत हा








अय्याजी झाला हें खालील वंशावळीवरून * दिसून येईल. ही वंशावळ ग्रंथांच्या प्रती करून घेतलेल्यानीं जी माहिती लिहून ठेविली आहे त्यावरून तयार केली आहे.

या घराण्यांतील पहिला पुरुष जो तिम्मण जोशी यानें शके १५९३ विरोधिकृत संवत्सर भाद्रपद वद्य ३० रोजी विजापूरचा बादशहा अली अदीलशहा यांस पूर्ण चंद्रदर्शन घडविल्याचा चमत्कार केल्याचें एका जुन्या कागदावर सविस्तर लिहिलें असून याच चमत्कारामुळें अली अदीलशहानें ताम्रपट दिल्याचें सांगण्यांत येतें; हा ताम्रपट पाहिलेले कांहीं वृद्ध गृहस्थ विजापुरात आहेत पण तो आज तरी सांपडत नाहीं. यांच घराण्यांतील पहिल्या अय्यण जोशीचा मुलगा राम जोशी यानें करण प्रकाशाची प्रत शके १६७४ मध्यें केली. या राम जोशीचा मुलगा अय्यण अथवा अय्याजी यानेंच शिवगीतेवर शके १७२२ मध्यें टीका लिहिली व हीच पोथी यांचेच घरीं सांपडली. अय्यण हें त्याच्या आजाचेंच नांव त्यांस ठेवलें होतें व ही प्रथा सर्वकडेच आहे.

याप्रमाणें अय्यण तथा अय्याजी याचा शोध लागला तरी त्याचे गुरु ज्ञानानंदांचा शोध लागणें अवश्य आहे. त्याचप्रमाणें वीरापूर हें गांव कोठील हें पाहिलें पाहिजे. आतां त्याकडे वळूं.

विजापुरांत रुकम पंडीत ( रुचिरानंद ) नांवाचे एक महान् संत रामदास तुकारामाचे वेळीं होऊन गेले. या रुकम पंडीत अथवा रुकमांगद पंडीतांचे जवळच कल्याणीचे संत व कवि शिवरामस्वामी विद्याभ्यासार्थ होते. ह्या रुकमांगदपंडीतांचे पट्टशिष्य राजीवानंद, हे राजीवानंद फार अधिकारी संत होऊन गेले. या राजीवानंदांस रुकमांगद पंडीतानीं अध्यात्मज्ञान प्रसाराची कामगिरी दिली होती व शिष्य शाखा वाढविण्याचीहि अनुज्ञा दिली होती. या राजीवानंदांचे अनेक शिष्य होते. त्यांतील प्रमुख हेः—

---

* वंशावळ —






अनुक्रमणिका

१ विमलानंद. २ कृष्णानंद ३ रामानंद. ४ परानंद. ५ ज्ञानानंद. (गुरु परंपरा श्लोक पंचक रुकमांगद चरित्र पान १८१ ) रुकमांगदानीं शके १६३२ मध्यें समाधि घेतली. राजीवानंदांनी शके १६७९ ईश्वरनाम संवत्सर माघ वद्य ६ स रात्रीं चंद्रोदय झाल्यावर देह ठेविला. या राजीवानंदांचे शिष्य जे ज्ञानानंद तेच अय्याजी भट्टांचे गुरु होत. राय जोशी घराणें परंपरेनें रुकमांगदांचे शिष्य-शाखेंत आहे. शकाच्या दृष्टीनें विचार करतां राजीवानंदांचा ज्ञानानंदांना शके १६७५-७६ चे सुमारांस अनुग्रह झाला असावा व त्यावेळीं त्यांचें वय २०-२२ वर्षांचें होतें असें धरलें तर त्यांचा शिष्य अय्याजी यानें शके १७२२ मध्यें टीका लिहिल्यावेळीं ज्ञानानंदांचें वय अजमासें ६७-६८ वर्षांचें असावें व अय्याजींचें वय टीका लिहिल्यावेळीं ३५-४० वर्षांचें असावें. याप्रमाणें कालदृष्ट्याहि जुळत आहे.

आतां ज्या गांवी असतांना अय्याजीनें ही सुबोधिनी टीका लिहिली त्या गांवचा शोध घेणें अवश्य आहे. हॉलनें हें वीरापूर गुजरातेंत असावें असें म्हटलें आहे. पण लेखकाच्या नांवावरून व तो आपल्या ग्रंथांत शक वर्ष देतो यावरून तो दक्षिणेंतील असावा हें लक्ष्यांत न आल्यानें गुजरातेंतील कोणत्यातरी एका वीरापूर अथवा बीरापूरशीं त्यानें संबंध जोडला. पण आपणांस स्पष्टपणें कळत आहे कीं अय्याजी हा कर्नाटकांतील असून तो विजापुरचा राहणारा आहे. त्याचे गुरु रुक्मांगद पंडिताच्या परंपरेतील ज्ञानानंद होत. तेव्हां याच बाजूला वीरापूरहि असणें शक्य आहे. या दृष्टीनें विचार करतां व शोध घेतां जें आढळलें तें हें:—

विजापूर मधील जुम्मा मशीद पेठेंत जुम्मामशीदीजवळ मुसलमानांचे मोहरमांत पीर बसत त्या बाजूस पीरापूर म्हणत व त्या उत्तरेकडील जरा आंतल्या बाजूस ज्या ठिकाणीं हें राय जोशी घराणें राहतें व ज्या ठिकाणीं यांच्या भाऊबंदांचीं घरें आहेत त्या बाजूस वीरापूर म्हणत असें कांहीं वृद्ध लोक सांगतात. पण कागदोपत्रीं पुराव्याचे अभावीं यांस महत्व देतां येत नाहीं. तेव्हां प्रत्यक्ष त्याच नांवाचें म्हणजे वीरापूर याच नांवाचें कोणतें गांव विजापूर जिल्ह्यामध्यें आहे काय ह्याचा शोध घेतां असें आढळलें कीं बागलकोट तालुक्यांत बागलकोटपासून ६–७ मैलावर घटप्रभेच्या काठीं वीरापूर नांवाचें गांव आजहि आहे. हें जोशी घराणें ज्योतिषी व वैदिकहि असल्याकारणें यांना अनेक गांवच्या वृत्त्या आहेत. शिवाय या घराण्यांतील मंडळी ठिकठिकाणीं आपल्या धंद्यानिमित्त जात असलेलीहि आढळतात. यास पुरावाहि देतां येण्याजोगा आहे. या अय्याजीचे चुलते राय जोशी सावनूर मुक्कामी शके १७०३ मध्यें असतांना त्यानीं प्रश्न वैष्णवीची करून घेतलेली प्रत उपलब्ध आहे. त्यावरून हें सिद्ध होतें कीं कामानिमित्त हे लोक गांवो गांवीं जात असत. शिवाय असेंहि संभवतें कीं गुरु ज्ञानानंद संचारार्थ वीरापूर मुक्कामी असतांना त्यांचेबरोबर त्यांचा शिष्यहि असावा म्हणूनच त्यानें त्याठिकाणीं आपल्या गुरूचे आज्ञेवरून ही सुबोधिनी टीका लिहिली व गांवाचें नांव पोथींत लिहिले.

आतां पर्यंतच्या सर्व विवेचनाचा मथितार्थ हा कीं शिवगीतेची सुबोधिनी टीका लिहिणारा अय्याजी हा विजापूर येथील राहणारा देशस्थ ऋग्वेदी स्मार्त भारद्वाज गोत्री जोशी घराण्यांतील असून त्याचा गुरु ज्ञानानंद हा रुक्मांगद पंडिताच्या परंपरेतील होय व अय्याजीनें बागलकोट जवळील वीरापूर मुक्कामी शके १७२२ मध्यें ती टीका लिहिली. *

---

* भारत इतिहास संशोधक मंडळांत वाचलेला लेख.








श्री. कल्याणराव

# मराठी भाषेंतील चिनी शब्द-- एक शंका

भाषाशास्त्राच्या अभ्यासकाला व्याकरणापैकीं व्युत्पत्तिशास्त्राचा आपल्या भाषेचा इतर देशांतील भाषेशी कसा संबंध आला हें ठरवावयास फार उपयोग होतो. असा उपयोग करावयाचा म्हणजे ज्या भाषेंतून स्वभाषेंत शब्द आले असें वाटत असेल त्या भाषेचाहि अभ्यास या व्युत्पत्तिशास्त्राच्या अभ्यासकाला असावा लागतो.

पण तसें आमचें नाहीं. आमचा चिनी भाषेचा अभ्यास चालू आहे. असा अभ्यास करीत असतां जे चिनी शब्द कानांवरून गेले त्यावरून आम्हाला असें वाटूं लागलें कीं मराठी भाषेचा फार मोठा परिणाम जरी नसला तरी पण कांहीं तरी परिणाम झालेला असावा.

आज असा एक समज रूढ झालेला आहे कीं बुद्धधर्मीयांनी चीनमध्यें प्रवेश केल्यानंतरच हिंदुस्थानचा व चीनचा घनिष्ठ संबंध आला. पण हें विधान खरें व वास्तववादी वाटत नाहीं.

वंशशास्त्राच्या अभ्यासकास पुसतां ते सांगतात कीं बंगाल, आसाम, सिक्किम, भूतान, नेपाळ, वगैरे ठिकाणचे बटबटित डोळ्यांचे व गोल चेहऱ्याचे पीतवर्णी लोक हे मंगोलियन वंशाचे लोक आहेत. ते चीन मधून हिंदुस्थानांत तिबेटमार्गें आले.

हा मंगोलियन वंश हिंदुस्थानच्या उत्तर पूर्व विभागांत पसरलेला आहे. या विभागास लागून तिबेट आहे. अमरकोशांत तिबेटाला त्रिविष्टप[1] असें नांव दिलें आहे व तो स्वर्ग या अर्थी प्रति शब्द म्हणून दिला आहे.

न्यायशास्त्राचा अभ्यास करावयास प्रारंभ केला म्हणजे लौगाभिभास्कराच्या तर्कसंग्रहांत प्रथमच जें सूत्र सांगितलें आहे तेथें स्वर्गकामो यजेत असें सांगितलें आहे. त्यावरून असें वाटतें कीं हिंदुस्थानांत आलेले जे लोक आहेत त्यापैकीं कांहीं या स्वर्गांतून आलेले असावेत.

स्वर्गाची आजची कल्पना कांहींहि असो पण पुराणवाङ्मयांत स्वर्गाची जी कल्पना आहे ती म्हणजे या तिबेटाची असावी असें वाटतें.[2] धर्मराजहि आपल्या आयुष्याच्या उत्तरकालीं मी स्वर्गाच्या वाटेनेंच चालत गेल्याचा उल्लेख पुराणांतून आढळतो.

यावरून असें वाटतें कीं बुद्धधर्मी लोकांचा चीनशी संबंध येण्याच्या अगोदरच हिंदुस्थानचा चीनशी या तिबेटमार्गें संबंध आला होता व या मार्गानेंच मंगोलियन वंशाच्या लोकांचा येथील निग्रॉईड वंशाच्या लोकांशी संबंध आला.

हा सारा इतिहास पाहतां हे मंगोलियन लोक आपणांबरोबर आपली भाषा घेऊन येणें अत्यंत स्वाभाविक आहे. या भाषेचा येथील भाषेशी मिलाफ होणें हेंहि अगदीं स्वाभाविक आहे.

उच्चारशास्त्राच्या ( Phonetics ) अभ्यास करणाऱ्यास हें आमचें म्हणणें अवश्य पटेल. आजचा बंगाली कसा गोल गोल बोलतो हें पहा व चिनीहि तसाच बोलतो तेंहि पहा म्हणजे या दोघांच्या उच्चारांतील साम्यावरून असें वाटतें कीं हिंदुस्थानचा संबंध जो चिनी लोकांशी आला तो बुद्धपूर्व काळांत केव्हां तरी आला. बुद्धधर्मीयांनी हा पूर्वापार आलेला संबंध जास्त दृढतर केला हें खरें असूं शकेल.

या पीतवर्णी मंगोल वंशीय लोकांचा संबंध बंगाल मधून ओरिसा व ओरिसा मधून छत्तीसगड व तेथून पुढें मराठी लोकांशी आलेला असावा असें अनुमान कांहीं भाषिक प्रमाणांवरून करतां येतें.

मराठी भाषेचा उगम नर्मदेच्या तीरावर झाला हें आतां सर्वमान्य तत्त्व समजलें जातें. ही मराठी भाषा संस्कृत भाषेची प्रगत आहे. संस्कृत-प्राकृत-अपभ्रष्ट व

१. (१) स्वर्ग – अमरटीकायां – स्वामी --वाचस्पति कोश
(२) त्रिविष्टपस्ये पतिं जयत्रः । रघु.
२. स्वर्गं त्रिविष्टपं प्राप्य धर्मराजो युधिष्ठिरः । --महाभारत वाचस्पति कोश







मराठी अशी वंशावळ सांगितली जाते. ही वंशावळ अगदींच तंतोतंत बरोबर असेल असें वाटत नाहीं. अपभ्रष्ट भाषेनंतर आणखी एकादी भेदभाषा त्यावेळीं प्रचलित असावी असें वाटतें. तिचें नांव महाराष्ट्री असणें संभवतें.

अशा या मराठी भाषेंत जी संपन्नता आली ती संस्कृत, प्राकृत, अरबी, उर्दू, कानडी, तेलगू अशा अनेक भाषामुळें या भाषांतील शब्दसंपत्तीचा जो स्वीकार केला गेला तो केवळ संपर्कामुळें नव्हे. संस्कृत भाषा तर मूळच तेव्हां तींतील शब्द मराठी भाषेंत आले तें कोणीहि समजूं शकेल. अरबी शब्दांची विपुलता जी मराठींत आली ती राज्यकर्त्यामुळें आली. पण कानडी वर्णमालेंतील अगर द्राविड वर्णमालेंतील ळ चा स्वीकार मराठी भाषेनें कां केला ? कोणत्या कर्णाटकी राज्यांशी आपला संबंध आला ?

हंपी विजयानगरच्या राजांशीं संबंध आल्यानंतर हा कानडी ळ आपल्या वर्णमालेंत शिरला असें म्हणावेसें वाटतें. काल्डवेल या द्राविडी व्याकरण ( Dravidian Grammar ) ग्रंथकर्त्याचें म्हणणें हा ळ द्राविड वर्णमालेंतला आहे. द्राविडवर्णामधील ह सदृश हा मराठींत लिहिला जातो.

द्राविड भाषेचा हा जसा परिणाम नर्मदेच्या तीरांवर उत्पन्न झालेल्या मराठी भाषेवर झालेला आहे तसाच चिनी भाषेचाहि परिणाम बंगाली–उदिया-छत्तीस गडी या मार्गें मराठी वर झाला असणें अगदींच केवळ अशक्य नाहीं. उडिया भाषेंतील भूतकाळीं क्रियापदें पाहिलीं म्हणजे असें वाटतें कीं मराठी भाषेवर उडिया भाषेचा पुष्कळच परिणाम झालेला असणें शक्य आहे.

मराठींतील हानि हा शब्द घ्या. कोणालाहि वाटेल या शब्दाची व्युत्पत्ति पहातां आपल्याला चीनच्या हान नामक राजवंशाकडे जावें लागेल.

हान हा शब्द बिहारी व उडिया भाषेंतील ग्रामीण विभागांत नुकसान याअर्थी वापरतात. हिंदी भाषेंतहि कोठें कोठें तो तसा वापरतांना आढळून येतो. या हानचें पुढें उच्चार सौकर्यार्थ हानि असें रूप झालें असावें.

चीनमधील लोक चांचेगिरीबद्दल बरेच प्रसिद्ध होते. त्या चांचेगिरीच्या आधारावर श्री. शिवराम महादेव परांजपे यांनीं लिहिलेली व चित्रमयजगत् मधून क्रमशः प्रसिद्ध केलेली कादंबरी आहे. ही चांचेगिरी करणाऱ्या कांहीं लोकांनी भुवनेश्वरीच्या आसपास येऊन लूटफाट केली असणें शक्य आहे. अशा या इतिहासाकडे आतां लक्ष द्यावें लागेल. या हान लोकांनी ही जी भारतामधील लोकांना नुकसान पोंचविली म्हणून हान–म्हणजे नुकसान असा अर्थ रूढ होऊन गेला असावा.

तसाच चांग हा शब्द कोठचा ? याची व्युत्पत्ति संस्कृत प्राकृत अपभ्रष्ट या भाषेंत मिळत नाहीं आणि चांग म्हणजे चांगला हा अर्थ या शब्दाला कसा प्राप्त झाला ? नुसताच चांग म्हणजे चांगला असा विशेषणात्मक अर्थ याला प्राप्त झाला असेंच केवळ नव्हे तर चांग्या, चांगदेव अशीं विशेषनामेंहि मराठी भाषेंत आढळतात. तीं सर्व चांग या विशेषनामांतूनच उद्भवलीं नसतील व कोणा च्यांग नामक चिनी माणसाच्या सहवासांतून आपल्या मराठी भाषेपर्यंत पोंचवलीं गेलीं नसतीलच असें म्हणावयास कांहीं जागा नाहीं.

बरें. " चिंगी " हें स्त्रीलिंगी विशेषनाम कसें रूढ झालें ? " चुंगळी " ची व्युत्पत्ति काय ? माऊ म्हणजे स्तन हा चिनी शब्द आपल्या भाषेंत कसा आला.

आपली कोणतीहि भगिनी अजूनहि लहान मुलांना मांडीवर घेऊन डोलवतांना च्याऊ माऊ पाताळाचं पाणी पिऊ हें गाणं जं म्हणते तें कांहीं चाऊ-एन् लाय व माउ–त्से-तुंग यांच्यावरील आपल्या प्रेमामुळें नव्हे. आजच्या चाऊमाऊंचा जरी संबंध या गाण्याशीं नसला तरी जुन्या काळीं कोणत्यातरी पाताळांत राहणाऱ्या चाऊमाऊंचा-चिनी लोकांचा-ऐतिहासिक संबंध खास दर्शवितो.

डॉ. कॅल्डवेल तर म्हणतात कीं, मराठी माणसाच्या डोक्यावरील शेंडी हीहि चिनी माणसाची देणगी आहे. सोळा संस्कारांत ज्या चिनी शेंडीनें स्थान मिळवलें त्या चिनी भाषेंतील कांहीं शब्द जर मराठी भाषेंत आले असले तर नवल मानावयाचें कांहींच कारण नाहीं.

लुकडा, चूत, हो, सान, बचणें, सुंगणे, सुंगणी, लुंग, लुंगी, शेंग, सेव, असे अनेक शब्द मराठी भाषेंत आहेत कीं ज्यांचे संबंध चिनी भाषेशीं असणें शक्य आहे. आमचा चिनी भाषेचा अभ्यास सुरूं आहे. कोणी जर या चिनी भाषेचा सर्वांगीण अभ्यास केला असेल तर आमची ही शंका खरी असल्याचें सांगेल का ?








अनुक्रमणिका

## पुस्तक-परामर्श –

**अनागोंदी अंदाधुंदी**– लेखक श्री. रा. टिकेकर पी. पी. एच्. बुकस्टॉल, मुंबई ४; पृष्ठ संख्या ८८, मूल्य रु. ३

लोकशाही म्हणजे जीवनाचें एक तत्त्वज्ञान, आचारविचारांचा एक विशिष्ट दृष्टिकोन व पद्धति हें खरें. त्याचप्रमाणें दैनंदिन राज्यकारभार चालविणारी ती एक विशाल शासनसंघटनापण असावी लागते. जीं उदात्त मूल्यें लोकशाहीशीं निगडित असतात त्यांचा प्रत्यक्ष अनुभव अशा संघटनेच्या-द्वारां मिळतो. म्हणून तिच्या स्वरूपास व संचालनास फार महत्त्व असतें. ज्यांच्या हातांत ती यंत्रणा चालविण्याची सत्ता व जबाबदारी असते ते अतिशय प्रामाणिक, कार्यक्षम व कर्तव्यदक्ष असावे लागतात. आपलें कर्तव्य बजावण्याचे बाबतींत लहान मोठा शासनवर्ग निष्काळजीपणा करूं लागला, किंवा स्वार्थी मोहास बळी पडून आपल्या अधिकारांचा दुरुपयोग केवळ स्वहित साधण्याकडे करूं लागला, तर लोकशाहीला अगदीं विकृत व विद्रूप असें स्वरूप प्राप्त होतें व लोकराज्याच्या मूळ श्रद्धेलाच मारक असें निराशेचें, वैफल्याचें व त्वेषाचें वातावरण समाजांत निर्माण होऊं लागतें. ती आपत्ति टाळण्याचा कसोशीचा प्रयत्न राज्यकर्त्यांनीं व लोकनेत्यांनीं केला पाहिजे.

भारतांतील लोकशाही हा एक प्रचंड व अपूर्व राजकीय व सामाजिक प्रयोग आहे. सध्यां तो अगदीं बाल्यावस्थेंत असल्यामुळें प्रारंभींच्या अपरिपक्वतेच्या अडचणींना त्याला तोंड द्यावें लागणें अपरिहार्य आहे. अशा वेळीं त्या प्रयोगाकडे अत्यंत काळजीपूर्वक लक्ष देणें व त्याच्या संचालनामध्यें दृष्टोत्पत्तीला येणारे दोष व धोके लोकांपुढें स्पष्टपणें मांडणें हें जाणत्या नागरिकांचें महत्त्वाचें कर्तव्य आहे. ‘अनागोंदी अंदाधुंदी’ हें अभ्यासपूर्ण पुस्तक प्रसिद्ध करून श्री. टिकेकरांनीं याबाबतींत मोठी कामगिरी केली आहे. भारताच्या राज्यकारभाराविषयीं सरकारतर्फे अधिकृतरीत्या पुष्कळ साधनसामग्री वरचेवर प्रसिद्ध करण्यांत येत असते. खासदार आमदारांना ती बव्हंशीं विनामूल्य पुरविण्यांत येते; कारण राज्यकारभाराशीं सतत संबंध ठेवून, त्यांतील दोष लोकांच्या नजरेला आणून, त्या कारभाराला योग्य तें वळण लावणें ही त्यांची जबाबदारी व कर्तव्य होय. या साधनसामग्रीपैकीं एका विशिष्ट व किचकट विभागाचें श्रमपूर्वक परिशीलन करण्यामध्यें श्री. टिकेकरांनीं संशोधनाचें एक फार फलदायी दालन, नव्यानें नाहीं तरी प्रामुख्यानें, अभ्यासकांपुढें आणलें याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे. हीं पुस्तकें नुसतीं मिळविण्यासाठीं त्यांना किती यातायात करावी लागली, किती हेलपाटे घालावे लागले त्याची त्यांनीं सांगितलेली हकीकत वाचली म्हणजे त्यांच्या कळकळीची व चिकाटीची कल्पना येते.

समाजाच्या स्थैर्यासाठीं व उन्नतीसाठीं राज्यसंस्था अस्तित्वांत येते व तीं ध्येयें साध्य करण्यासाठीं तिचा दैनंदिन कारभार चालवावा लागतो. लोकशाहीमध्यें हीं ध्येयें आपल्या नेत्यांच्या मार्गदर्शनाखालीं स्थूलमानानें लोकच निश्चित करतात, तीं फलद्रूप होण्यासाठीं कर रूपानें पैसे देतात व त्या पैशाचा उपयोग कशासाठीं व्हावा तें निर्दिष्ट करतात. हे सर्व आदेश देण्याचें कार्य लोकांनीं निवडलेल्या विधिमंडळांचे द्वारां केलें जातें. त्यांचा अम्मल करण्याची जबाबदारी शासनयंत्रणेवर असते. हा अम्मल नीट व्यवस्थित होतो आहे कीं नाहीं, त्यांत ढिलाई अथवा विस्कळितपणा दिसतो आहे कीं काय, लोकांकडून कर रूपानें घेतलेल्या पैशाचा अपव्यय अथवा अपहार केला जात नाहीं ना, इत्यादि बाबतींत जागरूकतेनें सारखी नजर ठेवावी लागते. दैनंदिन कारभारावर, व विशेषतः खर्चावर, अशी प्रखर देखरेख नसली तर निष्काळजीपणा, लबाडी, इत्यादि प्रकार उघडकीस येणार नाहींत, अधि-



अनुक्रमणिका







कार्‍यांची कर्तव्यच्युति व दुष्कृत्यें निर्भयपणें चालू रहातील व त्यामुळें देशाचें अपार नुकसान होईल.

सरकारच्या चालू खर्चावर देखरेख ठेऊन त्यांत कोठें काटकसर सुचवितां येणें शक्य आहे कीं काय तें सुचविण्यासाठीं, झालेल्या खर्चाचे हिशोब चोख आहेत कीं नाहीं, विधिमंडळानें आदेश दिल्याप्रमाणें रकमा खर्ची पडल्या आहेत कीं काय याचा कसून तपास ठेवण्यासाठीं, आपल्या राज्यघटनेच्या संचालनामध्यें दोन समित्यांची निर्मिती करण्यांत आली आहे. या समित्या संसदेनें आपल्या स्वतःच्या सभासदांमधून निवडलेल्या असतात. एकीचें नांव एस्टिमेट्स् कमिटी व दुसरीचें नांव पब्लिक अकाउंटस् कमिटी. सरकारच्या प्रत्येक खात्यांतील खर्चाच्या बाबत तपशीलवार चौकशी करण्याचा व संबंधित मंत्र्यांकडून पाहिजे असेल ती माहिती मागविण्याचा हक्क या कमिट्यांना असतो. अशा तर्‍हेनें केलेल्या सूक्ष्म अवलोकनाच्या व मिळविलेल्या माहितीच्या आधारावर त्यांनीं काढलेले निष्कर्ष संसदेला सादर करणें हें त्यांचें कर्तव्य आहे. त्यांनीं केलेल्या वृत्तांतांवर संसद् चर्चा करते, त्यांत दाखविलेल्या कारभारांतील चुका, वैगुण्यें, शिथिलता यांच्याबद्दल योग्य त्या मंत्र्यांकडे विचारणा करते, त्यांना जबाबदार असणार्‍या अधिकार्‍यांना कांहीं शासन झालें कीं नाहीं त्याची माहिती मागते. अशा चर्चेमुळें कर्मचारी अधिकार्‍यांवर साहजिक वचक बसतो, दोषी असतील त्यांना निदान ठपका बसण्याची तरी शक्यता निर्माण होते व त्यामुळें राज्यशकट शक्य तितक्या सावधानतेनें व प्रामाणिकपणानें चालण्यास मदत होते.

सरकारच्या अर्थसंकल्पामध्यें वेगवेगळ्या खात्यांसाठीं सबंध वर्षभराच्या खर्चाची तरतूद केलेली असते. हा खर्च अर्थात् एकदम, एक रकमी व एकहातीं होत नसतो. सतत वर्षभर तो चालू असतो. निरनिराळ्या ठिकाणीं व निरनिराळ्या व्यक्तींकडून तो केला जात असतो. हा खर्च होत असतांना त्यांत कोठें काटकसर होणें शक्य आहे कां, सरकारनें हातीं घेतलेल्या एखाद्या कामाची व्याप्ति कमी करून अथवा एखादें खातेंच कमी करून पैशाची बचत करणें इष्ट होईल कां, स्थूलमानानें आंखलेल्या वेळापत्रकाप्रमाणें कार्य व त्यावरचा खर्च होत आहे कीं नाहीं, इत्यादि विषयांवर अव्याहत व चालू स्वरूपाची देखरेख ठेवण्याची कांहीं व्यवस्था झाली तर तें फार हितावह असतें. खर्च होत असतांनाच जर त्याची सतत छाननी होत राहिली तर संभाव्य अपव्ययास वेळींच थोडा तरी आळा बसणें शक्य होतें. अशी चौकशी सतत करीत रहाण्याचें काम एस्टिमेटस् कमिटीकडे सोंपविण्यांत आलेलें आहे. प्रत्येक महत्त्वाच्या खात्यांतील व्यवहारांवर सूक्ष्मरीतीनें लक्ष देऊन त्यां संबंधींचे आपले अभिप्राय व आपल्या सूचना ही समिति करीत असते. तिचे वृत्तांत म्हणजे कांहीं अंशीं शासनाच्या दैनंदिन कारभाराचें चित्र असतें, त्या कारभारांतील अनिष्ट प्रकारांवर पाडलेला प्रकाशझोत असतो.

पब्लिक अकाउंटस कमिटीचें कार्य एका दृष्टीनें याच स्वरूपाचें असलें तरी तिची तपासणी खर्च चालू असतांना होत नाहीं तर खर्चाचे व्यवहार पूर्ण झाल्यानंतर ती होत असते. हिशेबतपासनिसाचें कामच तें होय. अर्थसंकल्पांत आदेश दिल्याप्रमाणें त्यां त्यां खात्यांवर व त्यात्या रकमेनें पैशांचा व्यय झाला कीं नाहीं, कोठें अधिक व अनधिकृत झाला कीं काय, संसदेनें घालून दिलेल्या मर्यादांचें व नियमांचें उल्लंघन झालें नाहींनां, इत्यादि विषयांची काळजीपूर्वक तपासणी करणें हें पब्लिक अकाउंटस कमिटीचें काम आहे. भारतीय संविधानामध्यें निर्भीडपणानें, कसल्याहि रागलोभाला बळी न पडतां, हिशेब तपासण्याचें काम व्हावें यासाठीं कंट्रोलर व ऑडिटर जनरल या स्वतंत्र वरिष्ठ अधिकार्‍याची निर्मिती करण्यांत आलेली आहे. हा अधिकारी






आपला तपशीलवार वृत्तांत पब्लिक अकाउंटस कमिटीस सादर करतो. तपासणीमध्यें निदर्शनास आलेल्या गैरप्रकारांची व नियमबाह्य झालेल्या घडामोडींची त्यांत माहिती असते. कमिटी त्यांची अधिक चौकशी करते व आपले स्वतःचे त्यावरील निष्कर्ष संसदेस सादर करते. खर्च होऊन गेल्यानंतर तीन चार वर्षांनीं या कमिटीचे अहवाल प्रसिद्ध होतात. त्यामुळें अपव्यय होण्याचें टाळतां येत नाहीं. तथापि त्यांनीं प्रसिद्धि दिलेल्या प्रमादांची पुनरावृत्ति होणार नाहीं अशी अपेक्षा बाळगतां येते. विधिमंडळांत व इतरत्र राज्यकारभारावर अवश्य तेव्हां टीकेची झोड उठविणें व अशा रीतीनें राज्यतंत्र सुरळित ठेवण्याची धडपड करणें हें लोकशाही पद्धतींतील परिणामकारक शस्त्र असतें.

स्वतंत्र भारतांत अशा अन्वेषणांची विशेष गरज आहे. भारतीय जनतेनें आपली आर्थिक व सांस्कृतिक प्रगति झपाट्यानें घडवून आणण्याचा संकल्प केला आहे. त्यासाठीं प्रचंड संकल्प हातीं घेतले असून अनेक कारखाने, विद्युत् निर्मितीचीं केंद्रें, इत्यादि बांधण्यांचें ठरवून तीं पुरीं करत आणलीं आहेत. लोककल्याणकारी व समाजवादी राज्य स्थापणें हें आपलें ध्येय आहे. अशा राज्यव्यवस्थेमध्यें सरकारनें स्वतः आर्थिक स्वरूपाचीं देखील कामें हातीं घ्यावीं हें निःसंशय अभिप्रेत आहे. जी 'मिश्र' अर्थयोजना आपण धोरण म्हणून स्वीकारली आहे तिच्यांत सार्वजनिक मालकीच्या व सरकारनें प्रत्यक्ष चालविलेल्या औद्योगिक क्षेत्राला प्राधान्य देण्यांत आलें आहे. देशाचा जसजसा विकास होत जाईल तसतसें हें क्षेत्र अधिक व्यापक होत जाईल. अशा व्यवस्थेमध्यें एकंदर सरकारी खात्यांची संख्या पुष्कळ वाढावी, अस्तित्वांत असलेल्या खात्यांचा आकार पुष्कळ वाढावा हें स्वाभाविकच नव्हे तर अपरिहार्य आहे. त्याबद्दल तक्रार करणें बरोबर होणार नाहीं. पण ही अवाढव्य जबाबदारी सरकारी यंत्रणा नीटपणें पार पाडीत आहे कीं नाहीं हें डोळ्यांत तेल घालून पाहत राहिलें नाहीं तर अनवस्था प्रसंग ओढवेल. कारण शेंकडों कोटी रुपयांचा खर्च या यंत्रणेमार्फत होत जावा लागतो आणि कोठल्याहि कारणामुळें त्यांत गफलत अथवा कर्तव्यच्युति होत गेली तर कार्यनाश व द्रव्यनाश होऊन राष्ट्राचें अपरिमित नुकसान होईल.

आपल्या छोटेखानी पुस्तकांत व त्यांत संकलित केलेल्या छोट्या छोट्या लेखांत श्री. टिकेकरांनीं गेल्या आठ दहा वर्षांमध्यें स्वतः सरकारनें उभारलेल्या व स्वतः सरकार कारभार चालवीत असलेल्या कांहीं औद्योगिक संस्थांतील व्यवहारासंबंधीं मोठी उद्वेगजनक माहिती दिली आहे. त्या संस्थांची स्थानभूमि नियुक्त करतांना, त्या भूमीवर अवश्य त्या इमारती बांधतांना, धंद्यांतील उत्पादनासाठीं जगाच्या बाजारपेठांतून यंत्रसामग्रीची निवड करतांना, तिची कार्यक्षमता अजमावतांना, तिचे खरेदीचे भाव ठरवितांना, परदेशीय निष्णातांच्या नेमणुकी व त्यांचें वेतन व नोकरीच्या इतर अटी मान्य करतांना, अगदीं प्रथमपासून ते सर्वश्रेष्ठ श्रेणीपर्यंतच्या जागांवर काम करण्याची संधि हिंदी तरुणांना अशा कारखान्यांत मिळून त्यांना तज्ज्ञशिक्षण व अनुभव मिळण्याविषयींचा आग्रह धरतांना, व्यापारी ठेके देतांना, इत्यादि अनेक बाबतींमध्यें जबाबदार अधिकाऱ्यांकडून कशी अक्षम्य हेळसांड झाली; ज्याच्यावर सहजासहजीं विश्वास ठेवणें देखील कठीण पडेल असे नियमभंगाचे, सारासार विचारशून्यतेचे, कर्तृत्वहीनतेचे, इतकेंच नव्हे तर 'कोठेंतरी खास पाणी मुरतें आहे' अशी रास्त शंका मनांत येण्याजोगे कितीतरी प्रकार घडले याचें श्री. टिकेकरांनीं उघडें केलेलें चित्र विस्मयकारकच नाहीं तर संतापजनक आहे. आपल्या राज्यतंत्रामध्यें असे भ्रष्ट प्रकार होऊं शकतात—मग त्यांचें एकंदरींत प्रमाण कितीहि अल्प असो—ही धोक्याची सूचना समजून नेते व नागरिक

या दोघांनीहि वेळींच सावध होणें हितावह आहे. कारण कार्यक्षमता व शील या दोन जीवनाधारांवरच राष्ट्र, राज्य व समाज टिकूं शकतात. वैयक्तिक व सार्वजनिक जीवनांत हे आधारस्तंभ सतत खंबीर, बळकट व अविचल रहातील अशी दक्षता सर्वांनीं घेतली पाहिजे.

लोखंड व पोलादाची विपुल प्रमाणांत उपलब्धि हें औद्योगिक प्रगतीचें पूरक साधन समजलें जातें; कारण हरतऱ्हेच्या मालाच्या उत्पादनासाठीं व नाना जातीचीं लहान मोठीं यंत्रें बनविण्यासाठीं लोखंड व पोलाद हीं पायारूप कच्चीं द्रव्यें असतात. सुदैवानें ही खनिज संपत्ति आपल्या देशांत आहे. तिच्यावर योग्य ते संस्कार करून धंद्यांना उपयुक्त होईल असें लोखंड व पोलाद तयार करण्याचे मोठे कारखाने आपल्या पंचवार्षिक योजनांमध्यें काढण्याचें ठरलें. राऊरकेला, भिलाई व दुर्गापूर या ठिकाणीं त्यांचें बांधकाम सुरूं होऊन आतां पुरें होण्याच्या मार्गांत आहे. त्यांच्यापैकीं कांहीं भट्टयांना नुकतेंच कार्यान्वितपण करण्यांत आलें. हे कारखाने सार्वजनिक विभागांत असून सरकारच त्यांचा प्रत्यक्ष कारभार करतें. या तिन्हींवर मिळून सुमारें साडे पांचशें कोटी रुपये खर्च झाले आहेत.

पब्लिक अकाउंटस् कमिटीनें आपल्या अहवालांत दिलेल्या माहितीनुसार हे कारखाने उभारण्याबाबत किती हलगर्जीपणा झाला, त्यांसाठीं लागणाऱ्या सर्व सामग्रीची नीट काळजीपूर्वक जुळवणी न झाल्यामुळें कशा अडचणी आल्या, कांहीं वस्तूंना कशा भरमसाट किंमती देण्यांत आल्या, ठेकेदारांशीं ठरलेल्या अटींचें त्यांच्याकडून बरोबर पालन न झाल्यामुळें आपल्या देशाला कसा भुर्दंड पडला, कारखान्यासाठीं लागणाऱ्या दगडी कोळशाचा पुरवठा योग्य तेवढया प्रमाणांत व योग्य वेळीं होईल अशी प्रथमपासूनच व्यवस्था न झाल्यामुळें कारखान्यांचें काम कसें खिरावलें व या सर्व अंदाधुंदीमुळें राष्ट्राचें कोटयवधि रुपयांचें नुकसान कसें झालें याचें मोठें विदारक वर्णन श्री. टिकेकरांनीं केलें आहे.

या तिन्ही कारखान्यांचा कारभार एकाच सरकारी कंपनीवर सोंपविण्यांत आला. तिचें नांव हिंदुस्थान स्टील व तिची पूरक कचेरी कारखान्यांपासून हजार मैल दूर दिल्लीला. या कंपनीवर तिला न झेपेल इतकी मोठी व व्यापक जबाबदारी लादलेली. लायक अधिकाऱ्यांची उणीव; अर्थात् तिच्याकडून काम नीट होणें शक्य नव्हतें. या पुस्तकांतील एक लेख या कंपनीवरच आहे. स्टील कंट्रोलर या सत्ताधिकाऱ्याच्या कचेरीनें केलेले अनेक नियमबाह्य व्यवहार, दंडकारण्य वसाहतीचें काम पार पाडण्याबाबत झालेली अक्षम्य दिरंगाई, घोडचुका व सुसूत्रपणाच्या अभावामुळें उडालेला गोंधळ व कार्यनाश, इत्यादि गंभीर गैरप्रकारांचें या पुस्तकांत रेखाटलेलें चित्र पाहून फार खेद होतो. संरक्षणखात्यानें एका कॅनेडिअन कंपनीला दिलेला कांहीं सामान पुरविण्याचा ठेका किती सदोष होता व त्यांचे दुष्परिणाम आपल्या देशाला कसे भोगावे लागले, त्याच खात्यानें केलेल्या जीप खरेदीमधल्या भानगडींत किती काळें बेरें उघडकीला आलें, चांदी गाळून शुद्ध करण्यासाठीं कलकत्त्यास स्थापन व्हावयाच्या कारखान्यांची योजना कशी बारगळली इत्यादि संबंधींची माहिती लेखकांनीं आंकडेनिशी दिली आहे. एकंदरींत या सर्व दुर्घटनांच्या वाचनानें चित्ताची प्रसन्नता नाहींशी होते, मन अस्वस्थ होतें.

श्री. टिकेकरांनीं हाताळलेला विषय गंभीर स्वरूपाचा आहे. त्याची माहिती मिळविण्यासाठीं त्यांनीं मोलाची मेहेनत घेतली आहे. ते यशस्वी पत्रकार आहेतच. या पुस्तकांतील कांहीं लेख वर्तमानपत्रांतून आधींच प्रसिद्ध झाले होते. पुस्तकरूपानें त्यांना अधिक चिरस्थायी स्वरूप देतांना त्या लेखांच्या विवेचनपद्धतीवर विन्ध्यायासंगी व सापेक्षी अशा टिकेकर








ग्रंथकाराचें संपादकीय संस्करण झालें असतें तर फार बरें झालें असतें असें निदान या वाचकाला तरी वाटलें. प्रत्येक प्रकरणांत टीकाविषय झालेले सरकारी अधिकाऱ्यांचे प्रमाद व कर्तव्यच्युति सत्य असूनसुद्धां सामान्य वाचकाला इतके अश्रद्धेय वाटण्याजोगे आहेत कीं पब्लिक अकाउंटस् कमिटी अथवा एस्टिमेटस् कमिटी यांच्या अहवालांत ते नमूद आहेत एवढेंच सांगून न थांबतां त्या त्या अहवालांतील उचित पानांचा व परिच्छेदांचा निर्देश लेखकांनीं प्रत्येक वेळीं केला असता तर योग्य झालें असतें. कांहीं ठिकाणीं त्यांनीं तसे निर्देश केलेले पण आहेत. दुसरें असें कीं इतक्या गंभीर स्वरूपाचें दोषाविष्करण या कमिट्यांनीं केलेले वाचल्यानंतर व त्याबाबत त्या कमिट्यांच्या सूचना वाचल्यानंतर वाचकांच्या मनांत साहजिक प्रश्न येतो कीं सरकारनें त्यांविषयीं कांहीं कृति केली कीं नाहीं ? चुका कशा झाल्या याचें स्पष्टीकरण मिळालें कां ? त्या करणारांविरुद्ध कांहीं उपाययोजना झाली कां ? या प्रश्नांचें उत्तर या पुस्तकांत मिळत नाहींच पण ज्यांत कदाचित तें मिळूं शकेल अशा साधनांचा उल्लेखपण ठळकपणें केलेला आढळत नाहीं.

श्री. टिकेकरांनीं आपल्या प्रस्तावनेंत सांगितलेंच आहे कीं एस्टिमेटस् कमिटीच्या वृत्तांतमालेमध्यें कांहीं वृत्तांत Action Taken म्हणजे कारवाई वृत्तांत या नांवाचे असतात. या वृत्तांताचा अभ्यास करण्याची त्यांना सवड मिळाली नाहीं. त्यामुळें या पुस्तकांत वर्णन केलेल्या दुर्घटनांना दुसरी म्हणजे सरकारची बाजू असलीच तरी ती वाचकांपुढें येऊं शकली नाहीं. ती बाजू सबळ असण्याची शक्यता फार कमीच. कारण या संसदीय समित्यांची चवकशी व चिकित्सा पुष्कळ कटाक्षानें व जबाबदारीच्या जाणीवेनें केली जाते. तथापि त्यांनीं उपस्थित केलेल्या मुद्यांना व दाखविलेल्या नियमोल्लंघनांना सरकारचें—म्हणजे लोकप्रतिनिधि असलेल्या मंत्र्यांचें—बहुधा कांहींतरी उत्तर असेल अशी अपेक्षा ठेवण्यास हरकत नाहीं. अशा उत्तरांच्या निदान अस्तित्वाची शक्यता तरी वाचकांच्या निदर्शनास त्या त्या स्थळीं आणली असती तर ठीक झालें असतें. वर्तमानपत्री भडकपणानें, क्वचित् हेतूंच्या आरोपानें व कल्पनाविलासानें, आणि खुसखुशित विशेषणांच्या वैपुल्यानें नटलेला वाक्प्रहार मनावर बिंबून रहातो व स्वतंत्र भारताची राज्ययंत्रणा एकंदरींत अगदीं कुचकामाची, लुच्चेगिरी लबाडीनें पूर्णपणें पोखरलेली व म्हणून देशहिताला विघातक अशी झालेली आहे असा निदान पुसट तरी ग्रह मनांत घर करून रहातो. तसें होणें रास्त नव्हे व इष्ट पण नव्हे.

हें मान्य केलें पाहिजे कीं पुस्तक लिहिण्याचा लेखकाचा मूळ हेतूच असा कीं सरकारी कारभारांतील सांवळा गोंधळ व अधिकाऱ्यांचीं दुष्कृत्यें यांच्यावर सरकारी साधनांच्याच सहाय्यानें झगझगता प्रकाश पाडावा. लोकशाहीमध्यें असें लोकशिक्षण होणें फार अगत्याचें आहे. त्याच्यामुळे होणाऱ्या जागृतीच्या जोरावरच लोकशाही जिवंत व प्रभावी राहूं शकते. अशा हेतूनें लिहिलेल्या पुस्तकाचा बहुतेक भाग टीकेनेंच व्यापलेला असणार व तो तसा असावा यांत वाद नाहीं. तथापि उच्च पातळीवरच्या टीकेमध्यें दुसऱ्या बाजूच्या संभाव्य अस्तित्वाचें स्पष्ट सूचन तरी असावें लागतें. तसें असलें म्हणजे एकांगीपणाच्या दोषाचा स्पर्श टळतो. टीकेमध्यें जमेच्या बाजूचा अगदींच अनुल्लेख नसला तर तिला अधिक वस्तुनिष्ठ व कल्याणकारी स्वरूप प्राप्त होतें. आत्मनिरीक्षण व अवश्य असेल तेव्हां आत्मताडन हीं प्रगतीचीं क्रियाशील साधनें होत यांत शंका नाहीं. त्याप्रमाणेंच, मिळालेल्या यशाच्या जाणीवेनें उत्पन्न होणारा आत्मविश्वास पण प्रगतीची बहुमोल प्रेरकशक्ति असते. तिच्या संरक्षणाकडे व संवर्धनाकडे लक्ष पुरविणें देखील महत्त्वाचें आहे.

— म. रा. पाळंदे



अनुक्रमणिका








१. या पुस्तकाला "गीता: एक अध्ययन' असें नांव देण्यांत लेखकानें औचित्यप्रकर्ष साधला आहे यांत शंका नाहीं. गीतेवर मराठींत अनेक पुस्तकें उपलब्ध असलीं तरी या पुस्तकाचें आपलें वैशिष्ट्य राहील" हा निवेदनांत प्रकट केलेला लेखकाचा विश्वास समर्थनीय वाटतो. कारण या बाबतींत श्री ज्ञानेश्वरांनीं आपल्या अमृतवाणीनें अतिसुंदर मार्गदर्शन पूर्वीच करून ठेवलें आहे:– "राजहंसाचें चालणें। भूतळीं जालिया शहाणें। आणिके काय कोणें। चालावेंचि ना॥"

२. तरीपण प्रत्येक गीताभ्यासी लेखकाला गीतातात्पर्याबद्दल कांहीं नवीन लिहितां येईल का? या प्रश्नाचें उत्तर आमच्या मतें असें आहे:– ज्याप्रमाणें 'पिण्डे पिण्डे मतिर्भिन्ना।' त्याप्रमाणेंच 'यथा यस्य मतिस्तथा तस्य गीतातात्पर्यम्।' असा विलक्षण अनुभव गीतेबाबत येतो! वामन पंडितासारख्या शान्तदान्त पंडितानें सुद्धा या बाबतींत वैतागून असे उद्गार काढले कीं "कोण्यामिसें तरी कोणी। गीतार्थ अन्यथा वाखाणी॥ मज नावडे ती थोरांचीहि करणी। काय करूं जीं भगवंता॥" बरें हे 'थोर' तरी कोण? तर श्रीशङ्कराचार्य, श्रीरामानुजाचार्यांसारखे महान् आचार्य कीं ज्यांच्या जीवन्मुक्तत्वाबद्दल कोणीहि शङ्का घेणार नाहीं! या समस्येचा परिहार आमच्या मतें पुढीलप्रमाणें आहे:– गीताग्रन्थाचें विषयविमर्शरमणीयत्वच (युगेयुगे) 'यन्नवतामुपैति तदेव रूपं रमणीयतायाः।' या दर्जाचें आहे! उपरिनिर्दिष्ट महान् आचार्यांच्या समोर त्या देशकालादि उपाधींनी घडविलेली प्रचलित समाजधर्मांतील प्रवृत्तिनिवृत्तींच्या आंदोलनाची एक विशिष्ट अवस्था होती. त्या अवस्थेंतील दोष दूर करण्याचें पवित्र कार्य समाजांतील 'श्रेष्ठ' अशा या आचार्यांचें होतें व तें त्यांनीं आपापल्या कालीं अशा कुशलतेनें केलें कीं अज्ञांचा बुद्धिभेद होऊं नये व सुज्ञांना योग्य मार्गदर्शन व्हावें. असें करतांना अर्थातच त्यांना गीतेंत प्रतिपादिलेल्या (ज्ञान, भक्ति, कर्म इत्यादि) विविध (समन्वित) योगांपैकीं जो योग तत्तत्कालीन धर्मग्लानिवर गुणकारी ठरेल त्या योगावरच जोरदार भर देणें भाग पडलें! असो.

३. सर्वसामान्य रीतीनें डॉ. केंघे यांच्या पुस्तकाबद्दल आम्हास असें म्हणावेसें वाटतें कीं गीतेच्या कोणत्याहि अभ्यासकाला (छात्र वा प्रौढ दशेंतल्या), हें उपयुक्त ठरेल. पुस्तकाची भाषा ओघवती व सरस आहे. शिवाय गीतेंतल्या विविध विषयांचें वर्गीकरण सुगम पद्धतीनें करून प्रत्येक विषयाची शक्य तितकी खुलासेवार चर्चा संशोधनपूर्वक एका स्वतंत्र प्रकरणांत केली आहे. अत एव प्रस्तुत परीक्षणहि प्रकरणशःच करणें सोइस्कर होईल.

४. 'उपोद्घात' (पृ. १ ते ५):– अध्यायपरिसमाप्ति सूचक संकल्पाचा उपयोग गीतातात्पर्य ठरवितांना फार सावधगिरीनें व योग्य इतकाच केला पाहिजे. कारण गीतारचनेनन्तर बराच कालावधि लोटल्यावर ('हस्तलिखित' युगांत) तो गीतेला जोडण्यांत आला आहे. हा संकल्प म्हणजे गीतेंतील मुख्य व गौण अशा निरनिराळ्या विषयांचें नामकरण करण्याचा एक स्तुत्य उपक्रम होय. प्रत्येक अध्यायाला एका विशिष्ट योगाचें नांव देऊन गीता म्हणजे अनेक योग भेदयुक्त योगशास्त्र (व ब्रह्मविद्या) आहे असें यांत सूचित केलें आहे. संकल्पांतील सर्व पदांचा सामानाधिकरणानें विचार केला तर यौगपद्यानें गीता ही 'ब्रह्मविद्या'हि आहे, 'योगशास्त्र'हि आहे व 'श्रीकृष्णार्जुन संवाद'हि आहे. तेव्हां या सर्वांच्या सहास्तित्वाच्या सामानाधारत्वाच्या वा समन्वयाच्या दृष्टीनें संकल्पाचा अर्थ गीता म्हणजे "ब्रह्मविद्यान्तर्गत योगशास्त्र" असा लावला (टिळक) तर 'तो अर्थ (कीं ज्यांत ब्रह्मविद्येलाच प्राधान्य दिलें आहे) योग्य नाहीं' असें म्हणणें (पृ. ३) म्हणजे शब्दांचा कीस काढणें होय असें आम्हांस वाटतें.

५. 'गीता आणि महाभारत' (पृ. ५ ते १०) "अर्जुनाला युद्धाचे दुष्परिणाम आणि स्वजनहत्या ह्या गोष्टी माहीत नव्हत्या असें कसें म्हणतां येईल?" असा प्रश्न लेखकानें केला आहे (पृ. ९) परंतु या गोष्टी माहीत नव्हत्या असें कोणीच म्हणत नाहीं. ह्या गोष्टी माहीत असूनसुद्धां प्रत्यक्ष रणभूमीवर दोन्ही सैन्यांच्या मध्यें रथ उभा केल्यानंतर अर्जुनानें उभय सैन्यांचें अवेक्षण करणें हा जो अत्यंत नाट्यपूर्ण प्रसंग गीतेंत आहे त्याचा कांहीं विशेष परिणाम अर्जुनावर








झाला तर तो (त्याच्या पूर्वीच्या भूमिकेमुळें) अस्वाभाविक वाटण्यासारखा नाहीं. युद्धांतील संभाव्य असा अमानुष मानवसंहार एकाएकीं डोळ्यांपुढें चमकून गेल्यानंतर अर्जुनाला वैराग्याचा झटका आला तेव्हां त्याचें पर्यवसान निवृत्तिवादाच्या मोहक तत्त्वज्ञानामुळें अवसानघातकी व 'दुष्कृतां विनाश' पुढें ढकलणाऱ्या युद्धनिवृत्तींत होईल अशी भीति वाटल्यामुळें त्या तत्त्वज्ञानाला तोडीस तोड म्हणून स्वधर्माचरणप्रधान कर्मयोगरूपी ब्रह्मविद्यान्वित प्रवृत्तिवाद त्याच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न भगवन्तांनीं करावा हें अगदीं स्वाभाविक वाटतें.

६. **'गीता आणि उपनिषदें'** (पृ. ११ ते १३) हें प्रकरण फारच सुंदर वठलें आहे. थोडक्यांत सर्व महत्त्वाचे मुद्दे यथायोग्य मांडले गेले आहेत.

७. **'गीता आणि ब्रह्मसूत्रें'** (पृ. १३ ते १६). हें प्रकरणहि या प्रस्थानद्वयाच्या परस्परसंबंधाविषयींच्या विविधमतांचा उचित परामर्श घेतल्यामुळें वाचनीय झालें आहे.

८. **'गीता आणि वेद (कर्मकाण्ड)'** (पृ. १७ ते २४). "यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके। तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः॥ (२·४६) या श्लोकाचा फारच कमी ओढाताणीचा अन्वय टिळकांनीं लावलेला आहे. शिवाय सनत्सुजातीयांत व शांतिपर्वांत थोड्या शब्दभेदानें आलेले समानार्थक श्लोक, तसेंच पाण्डवगीतेंतील ('कूप') व पाली ग्रन्थांतील ('उदपान') 'विहीरी' चा समान प्रयोजनदृष्टान्तहि त्यांनीं दाखविलेला आहे. तेव्हां त्यांचा अर्थच मान्य करणें योग्य होय. श्रीशङ्कराचार्यांच्या अन्वयार्थांत वेद व ज्ञान यांची जी बरोबरी ध्वनित होते ती संदर्भाशी (२.४२–४५) व विशेषतः ४५ व्या श्लोकांत वेदांचें जें अकिञ्चित्करत्व सूचित केलें आहे त्याशीं विसङ्गत होय. तेलंग यांनी तर ४५ व्या श्लोकाचा सरलतम असा अन्वय केला आहे. "सर्वतः संप्लुतोदके (अत एव अपेयपाने) उदपाने यावान् अर्थः, तावान् (एव) विजानतः ब्राह्मणस्य सर्वेषु वेदेषु।" शिवाय तेलंग यांनीं आपल्या प्रस्तावनेंत एक अत्यंत मार्मिक व विचारार्ह सूचना केली आहे तिजकडे डॉ. केंघे यांचें लक्ष आम्ही वेधूं इच्छितों. त्यांच्यामतें गीतोपनिषत्काल प्रसिद्ध अशा जुन्या उपनिषदांच्या कालाच्या इतकाजवळचा होता की, उपनिषदांची गणना, श्रुति (अथवा वेद) यामध्यें (ज्ञानकाण्ड म्हणून) गीताकालीं अजून सर्वमान्य व्हावयाची होती. या कल्पनेनें एका आश्चर्याचा उत्तम उलगडा होतो तें म्हणजे वेदांवर गीता जेव्हां टीका करते तेव्हां वेदांतील कर्मकाण्डच केवळ टीकार्ह होय असा भेद बिलकुल करीत नाहीं!

९. **'भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत गीतेचें स्थान'** (पृ. २४ ते ३२): हें प्रकरण चांगलें साधलें आहे. पण बौद्ध धर्मान्तर्गत महायान पंथाच्या तत्त्वज्ञानावर गीतेची केवढी छाप पडली आहे याचा या प्रकरणांत उल्लेख पाहिजे होता. बऱ्याच वर्षांपूर्वी 'नवभारत' मासिकांतच प्रसिद्ध झालेल्या "ऋग्वेदांतील भक्तिपंथ" या आमच्या लेखांत डॉ. केंघे यांच्या भक्तिसंप्रदायाच्या इतिहासाविषयींच्या मताला पुष्टि मिळेल असा ऋग्वेदीय पुरावा आम्ही माण्डला आहे.

१०. 'गीतेंतील ब्रह्मविद्या', 'क्षेत्रक्षेत्रज्ञविचार', 'क्षराक्षरविचार', 'कापिलसांख्यशास्त्र', 'गुणत्रयविचार' व 'कर्म आणि पुनर्जन्म' (पृ. ३२ ते ५४) ह्या सहाहि सुंदर प्रकरणांबद्दल लेखकांचें अभिनन्दन करावेंसें वाटतें. 'क्षराक्षरविचार' या प्रकरणांत 'क्षर पुरुष म्हणजे देहादियुक्त आत्मा' असें म्हटलें आहे (पृ. ३९), एतच्चिन्त्यम्! आत्म्याला 'क्षर' हें विशेषण आत्म्याच्या कोणत्याहि अवस्थेला अनुलक्षून गीता लावील हें संभवनीय नाहीं. तेव्हां श्री शंकराचार्य व टिळक या दोघांच्या बहुतांशीं जुळणाऱ्या अभिप्रायाप्रमाणेंच 'क्षरः सर्वाणिभूतानि' (१५·१६) या पादाचा अर्थ करणें योग्य. 'आठव्या अध्यायांत पुनर्जन्माची वेगळीच उपपत्ति लावलेली दिसते' असें म्हटलें आहे (पृ. ५०) आमच्या मतें ही (८·६) वेगळी उपपत्ति नाहीं तर आमरण ज्या 'भावाचें' स्मरण वा अनुचिन्तन असतें त्याचेंच स्मरण अन्तकालीं होतें व त्या 'भावांप्रत मनुष्य मरणोत्तर प्राप्त होतो असें सांगून पुनर्जन्माच्या प्रक्रियेबद्दल एक नियम गीतेने दिला आहे. आठव्या अध्यायांतील २२ ते २७ या श्लोकांतील मृत्यूत्तर गतींच्या वर्णनांतील कालवाचक शब्दांचा उलगडा गीतारहस्यांत अत्यंत समर्पक

रीतीनें केला आहे त्याला योग्य तो मान लेखकानें दिला नाहीं. आम्हांस मात्र एक नवीन स्पष्टीकरण सुचवावेंसें वाटतें:—जगविख्यात विज्ञानशास्त्रज्ञ आइन्स्टाइन् यानें काल हें ' दिक् ( अवकाश, अन्तराल वा स्थल )' याचें चतुर्थ परिमाण आहे व ' विश्व ' म्हणजे ' दिक्कालांचा पसारा ' ( Space-Time-Continuum ) होय, हा जो सिद्धान्त प्रस्थापित केला आहे त्यानें या गतिवर्णनांतील मार्गांच्या टप्प्यांना जे कालवाचक शब्द लावले आहेत त्यांचा उलगडा होतो.

११. '**गीतेंतील ईश्वरविचार**' ( पृ. ५५ ते ६६ ) या प्रकरणांत एका महत्त्वाच्या विषयाच्या निरनिराळ्या पैलूंचें यथार्थ दर्शन व्हावें इतका वाव मिळाला आहे व त्याचें चीज डॉ. कंघे यांनीं केलें आहे. ह्या प्रकरणांतील विवेचनाला परिपूर्णता यावी म्हणून पुढील गोष्टींचा उल्लेख त्यांत असावा असें आम्हांस वाटतें:-अंतिम सत्याचें वा तत्त्वाचें (Absolute) वर्णन गीतेंत **चार** प्रकारांनीं केलें आहे. ( अ ) ब्रह्म, ( ब ) आत्मा ( अथवा परमात्मा ) (क) ईश्वर, महेश्वर, विभु अथवा पर पुरुष आणि ( ड ) श्रीकृष्ण ( प्रथम पुरुषांतील वर्णन ). दुसरी गोष्ट म्हणजे अशिवाच्या समस्येचें ( Problem of Evil ) उत्तर ( पृ. ५७ ) गीतेंतून अनुमानानें सहज निघू शकतें तें असें : ' अशिव व शिव ' ही जोडी किंवा हें द्वन्द्व परस्परसापेक्ष होय म्हणजे एकाला दुसऱ्याशिवाय अस्तित्वच नाहीं. [ Good can have no meaning without the existence of Evil हें तत्त्व स्वामी विवेकानन्दांनी आपल्या व्याख्यानांत फार सुंदर रीतीनें विशद केलें आहे. ] गीता सुद्धा, ब्रह्मभूत, योगारूढ, गुणातीत वा परमभक्त या जीवन्मुक्तांच्या वर्णनांत त्यांच्या द्वंद्वातीतत्वावर नेहमी भर देते. सुखदुःखादि प्रसिद्ध द्वंद्वांपैकीं एक टाळावयाचें असेल तर दुसरेंहि सोडलेंच पाहिजे असेंच या वर्णनांत गीता ध्वनित करते.

१२. '**अवतार रहस्य आणि मायावाद**' व '**ब्रह्म**' (पृ. ६७ ते ७७) हीं दोनहि प्रकरणें आपापल्या विषयांचा योग्य परामर्श घेणारीं अशीं आहेत.

१३. '**सांख्य आणि योग**' ( पृ. ७७ ते ८६ ) दुसऱ्या अध्यायाच्या ३९ व्या श्लोकांतील " एषातेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां श्रृणु ' या श्लोकार्धांत तत्पूर्वीचे ( ३१ ते ३८ ) श्लोक कसे बसवायचे याची चर्चा आजपर्यंत पुष्कळ झाली आहे व तिचा गोषवाराहि डॉ. कंघे यांनी यथायोग्य दिला आहे. शेवटीं निष्पन्न काय होतें याबद्दल आमचें मत पुढीलप्रमाणें आहे:— २·३१ ( " स्वधर्ममपि चावेक्ष्य... " ) या श्लोकांचें स्पष्टीकरण करतांना टिळक लिहितात : "संन्यास किंवा सांख्य मार्गाप्रमाणें कर्मसंन्यासरूपी चतुर्थाश्रम ही जरी शेवटची पायरी असली तरी तत्पूर्वी ब्राह्मणानें ब्राह्मणधर्म व क्षत्रियानें क्षत्रियधर्म चातुर्वर्ण्यव्यवस्थेप्रमाणे पाळून गृहस्थाश्रम पुरा केला पाहिजे " या टिळकांच्या मताला, ' महाराष्ट्रिय ' ( श्री. पाटणकर ) यांच्या ' एकता ' या मासिकांत प्रसिद्ध झालेल्या " गीतेंतील दोन निष्ठा " या लेखांतील सांख्यमतेतिहासाच्या संशोधनानें फारच जोराची पुष्टि मिळाली आहे. त्यांच्या म्हणण्याचा गोषवारा असा आहे:— " कपिल मुनि म्हणतात, ' अपवर्गमनिर्नित्यो यतिधर्मः सनातनः। **साधारणः केवलो** वा यथाबलमुपासते ॥ " ' **केवल** ' यतिधर्म म्हणजे यतींना अवश्य असलेला विहित धर्म व ' साधारण ' म्हणजे **सर्व आश्रमांमध्यें** आचरितां येण्यासारखा यतिधर्म. हा भेद आश्रमधर्मांच्या अपेक्षेनेंच केलेला आहे. म्हणजे चालू आश्रमधर्मांमध्येंच सांख्यांच्या ' साधारण ' यतिधर्मांचीं तत्त्वें अनुस्यूत आहेत. ज्ञानोत्तर पुरुषानें यतिधर्मांचें पालन चालू **आश्रमानंतर संन्यास घेऊन अथवा त्याच आश्रमीं राहून करावें** या धोरणांनें हे दोन विभाग वा भेद केले आहेत " तेव्हां इत्यर्थ हा कीं ' स्वधर्ममपि चावेक्ष्य " इत्यादि **२·३१ ते ३८ या श्लोकांत केलेला उपदेश पूर्णपणें** सांख्य तत्त्वप्रणालिकेशी सांख्यांच्या साधारण यतिधर्माशी जुळतो व पेंचप्रसंग सुटतो. असो. " योगबुद्धि ( २·३९ ) म्हणजे कर्मनिष्ठा हा अर्थहि सर्वथा योग्य दिसत नाहीं " ( पृ. ८१ ) हें लेखकाचें म्हणणें दुसऱ्या अध्यायांतील सर्वसंदर्भांशी बिलकूल जुळत नाहीं. गीतेनें योगाची व्याख्या ( २·४८ ) ' समत्व अशी केली आहे पण हें समत्व त्या श्लोकांत असंदिग्ध










१६. **ज्ञानयोग** (पृ. १०७ ते ११३) "ज्ञानयोगी व्यक्तीला... शरीर धारणेपुरतें कर्म पुरे" (पृ. ११०) हें ठीक पण १३.७–११ या श्लोकांत गीतेनें ज्ञानाची जी विस्तृत व्याख्या केली आहे तिच्यांत 'असक्तिरनभिष्वङ्गः पुत्रदारगृहादिषु" ह्या वर्णनावरून ज्ञान्यांपैकीं कांहीं गृहस्थाश्रमीहि असणें शक्य आहे हा निष्कर्ष निघतोच. गीतेंतील 'विज्ञान' या शब्दाच्या अर्थाचें विवेचन डॉ. केंघे यांनीं चांगलें केलें आहे (पृ. ११३). आम्हाला आणखी एक अर्थ सुचवावासा वाटतो:— ९–१५ या श्लोकांत भगवंतांचें ज्ञान यज्ञानें यजन करणारे भगवंताची उपासना ज्या प्रकारांनीं करतात त्यांचें वर्णन आहे. एक प्रकार 'एकत्वेन' म्हणजे एका ईश्वरापासूनच सर्व विस्तार होतो असें चिन्तन करणें हा होय [" तत एव च विस्तारम्– १३·३० उत्तरार्ध] हेंच ज्ञान. दुसरा प्रकार 'पृथक्त्वेन' म्हणजे पृथक् पृथक् भासणारीं जीं भूतें त्या सर्वांचा समावेश एकाच तत्त्वांत होतो हें दर्शन अथवा चिन्तन [" यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति" १३.३० पूर्वार्ध ] हेंच विज्ञान.

१७. **ध्यान योग** (पृ. ११४ ते १२१) ध्यानयोग हा मुख्यतः कर्मयोग, ज्ञानयोग व भक्तियोग ह्या सर्वांना अङ्गभूत असा योग आहे हें आमचें मत वर (परिच्छेद १४) मांडलेंच आहे. शिवाय कोठल्याहि मार्गांत शेवटीं ध्यानानेंच आत्मदर्शन होणार. परंतु केवळ ध्यानयोगाचेंच अवलंबन करणारे साधकहि असणारच व त्या दृष्टीनें ध्यानयोगाचा स्वतंत्र मार्ग असा उल्लेख १३.२४ या श्लोकांत डॉ. केंघे म्हणतात त्याप्रमाणें समर्थनीयच ठरतो. पातञ्जल योगाचीं निरनिराळीं अंगें गीतेंत कशीं **पूर्वसूचित** झालीं आहेत हें दाखविण्याचा डॉ. केंघे यांचा प्रयत्न स्तुत्य असून तो त्यांच्या सूक्ष्म विवेचक शक्तीची साक्ष होय. पण गीतेंतील ध्यानयोग पातञ्जलयोगाच्या चौकटींत बसविण्याच्या प्रयत्नांत कांहीं अडचणी येणारच. उदाहरणार्थ (पातञ्जल) यमनियमांचा अन्तर्भाव ६·३ या श्लोकांत उल्लेखिलेल्या कर्मांत करणें (पृ. ११५) हें फारच कृत्रिम वाटतें. दुसरी अडचण म्हणजे सहाव्या अध्यायांतील ध्यानयोगांच्या सुसूत्र वर्णनांत प्राणायामाचा उल्लेख नाहीं ! ५.२७ या श्लोकांतील 'प्राणापानौसमौकृत्वा' इत्यादिवर्णन जीवन्मुक्ताच्या स्थितीच्या वर्णनाचा भाग असून त्याचा संबंध ६ व्या अध्यायांतील ध्यानयोगाशी जोडणें म्हणजे ओढाताण करणें होय.

१८. **'भक्तियोग'** (पृ. १२२ ते १२५) हें प्रकरण आम्हांस फारच आवडलें. ह्यांतील सर्वच विवेचन (एक अपवाद सोडला तर) हृदयंगम व मूलग्राही झालें आहे. अपवाद म्हणजे १२.८-१२ ह्या श्लोकांचा अर्थ (पृ. १३१). लेखकाच्यामतें १२.११ या श्लोकांत फलत्यागाचें 'गौणत्व' दाखविलें आहे (पृ. १३३). आमच्यामतें 'सुलभत्व' म्हणजे 'गौणत्व' नव्हे. उदाहरणार्थ अव्यक्तोपासनेपेक्षा श्रीकृष्णांची भक्तियुक्त उपासना ही कमी क्लेशाची (अथवा ज्यास्त सुलभ) म्हणून गौण ठरविलेली नाहीं (१२, १ ते ७) 'श्रेयः' हें 'ज्ञानम्' या शब्दाचें विशेषण घेणें म्हणजे तुटेपर्यंत अन्वय ताणणें होय. या श्लोकांमधील शब्दरचनाच असमाधानकारक आहे. समन्वय करावयाचाच तर 'श्रेयः' व 'विशिष्यते' हे शब्द केवळ सौलभ्याच्या दृष्टीनें वापरले आहेत असें समजावें.

१९. **'नियति आणि पुरुषार्थ'** (पृ. १३५ ते १३९) हें प्रकरण अत्युत्कृष्ट वठलें आहे. या विषयावरील पाश्चात्यांच्या विचारांची चर्चा सुबोध व उद्‌बोधक झाली आहे.

२०. **'पूर्णयोग अर्थात् प्राप्तावस्था** (पृ. १३९-१४६) " भिन्न भिन्न मार्गांनी पूर्णयोग प्राप्त करून घेणाऱ्या योग्यांच्या आचरणांत लौकिक दृष्ट्या कांहीं फरक राहणें अगदींच असंभवनीय नाहीं " (पृ. १४६). हा अगदीं योग्य निष्कर्ष डॉ. केंघे यांनी या प्रकरणांत काढला आहे.

२१. **" अध्यायसंगति "** (पृ. १४७–१६५) गीतेमधील प्रक्षिप्त श्लोकांचा शोध लावणाऱ्या गार्बे या जर्मन् संशोधकाच्या मताची अध्यायवार चर्चा या प्रकरणांत केल्यामुळें या प्रकरणाची उपयुक्तता वाढली आहे. चवथ्या अध्यायाच्या प्रारंभीं वर्णिलेल्या 'योग' परंपरेचें महाभारतांत इतरत्र सांगितलेल्या नारायणीय (अथवा भागवत) धर्माच्या परंपरेशी जें विलक्षण साम्य आहे त्याचा उल्लेख या प्रकरणांत करावयास पाहिजे होता.

२२. " तात्पर्य विचार आणि उपयुक्तता " ( पृ. १६५–१६९ ) तात्पर्य निश्चित करण्याकरितां उपक्रमो-पसंहारावर भर देणें योग्यच आहे. आमच्या मतें गीतेचें तात्पर्य पुढीलप्रमाणें आहे:— अर्जुन हा एक महान् भगवद्भक्त व क्षत्रियांचा एक 'श्रेष्ठ' नेता होता. स्वधर्माचरणाचा एक भाग म्हणून 'युद्धे अपलायनम्' हें त्याचें नियत व स्वभावज असें क्षात्र कर्म होतें. त्यांत पुनः 'दुष्कृत' व 'विनाशार्ह' अशा कौरवांशीं युद्ध म्हणजे धर्मयुद्ध असें न्याय व नीतीच्या सर्व कसोटयांनी ठरलें होतें. असें असतां ऐनवेळीं युद्धांत अटळ अशा स्वजनहत्येच्या (तथा-कथित ) पापाला तो भ्यायला व स्वधर्म सोडूं लागला तेव्हां " यस्य नाहंकृतो भावः बुद्धिर्यस्य न लिप्यते । हत्वापि सइमाँल्लोकान् न हन्ति न निबध्यते ॥"(१८.१७) हें तत्त्व ज्या ब्रह्मविद्येंत व योगशास्त्रांत यौगपद्यानें बसूं शकतें, त्यांचा उपदेश भगवन्तानीं त्याला केला. त्याचा परिणाम असा झाला कीं स्वधर्माचरणांत कांहीं काळेंबेरें ( नैतिकदृष्टया ) आहे असा जो त्यांचा संदेह, तो दूर झाला. लोकसंग्रह हें ज्याचें कर्तव्य आहे असा समाजांतील एक श्रेष्ठ तो असल्यानें साधकावस्थेंतच नव्हे तर सिद्धावस्थेंत सुद्धा स्वधर्म आचरून दाखवू-नच अज्ञांचा बुद्धिभेद टाळणें त्याला प्राप्त होतें व म्हणून धर्मयुद्धांतील पापाची शंका दूर झाल्या बरोबर "स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव" (१८.७३) असें त्यानें शेवटीं उद्घोषित केलें. लेखकानें तात्प-र्याच्या दृष्टीनें 'समत्वावर' फार जोर दिला आहे. पण हें समत्व म्हणजे 'योगस्थ' होऊन व 'संग' टाकून देऊन कर्मे करीत असतां कर्मांच्या सिद्धीविषयी वा असिद्धिविषयीं सम राहणें व हें संगत्व म्हणजेच योग. तेव्हां प्रस्थानत्रयींत गीतेनेंच इतर मार्गांकडे दुर्लक्ष न करितां भक्तियुक्त कर्मयोगावर भर दिला हें नाकारतां येणार नाहीं.

२३. हें तपशीलवार व प्रकरणशः परीक्षण करतांना आम्हांला आमचीं भिन्न मतें पुष्कळ ठिकाणीं नमूद करावीं लागलीं पण त्यामुळें डॉ. केंघे यांच्या पुस्तकांची उपयुक्तता व योग्यता बिलकुल कमी होत नाहीं व केवळ विद्यार्थ्यांनाच नव्हे तर इतर गीताभ्यासकांना सुद्धा हें पुस्तक बोधप्रद ठरेल असें आमचें 'निश्चितं मतमुत्तमम्' आहे. तेव्हां सूक्ष्म अभ्यास व संशोधन करून एक वाचनीय पुस्तक गीताभक्तांपुढें ठेवल्याबद्दल लेखकाचें अभिनन्दन करून हें परीक्षण पुरें करतों.

—डॉ. वि. म. आपटे





अनुक्रमणिका








## प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... | ... ... | ५२–०–० |
| | कापडी बांधणी ... | ... ... | ६४–०–० |
| (२) | धर्मकोश– उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... | ... ... | ११०–०–० |
| | कापडी बांधणी ... | ... ... | १२६–०–० |
| (३) | धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला | .... | ४५–०–० |
| (४) | मीमांसादर्शन ... ... ... | ... | ३०–०–० |
| (५) | मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | | १६५–०–० |
| (६) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... | ... | ६–०–० |
| (७) | हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) | ... | ५–०–० |
| (८) | वैदिक संस्कृतीचा विकास ... .. | ... | ६–०–० |
| (९) | नवमानवतावाद ... ... ... | ... | २–८–० |
| (१०) | मानवाचा आदर्श ... ... ... | ... | ३–०–० |
| (११) | चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | ... | ३–०–० |
| (१२) | गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) | ... | २–८–० |
| (१३) | छत्रपति संभाजी महाराज (श्री. वा. सी. बेंद्रे) | .... | १६–०–० |
| (१४) | महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना (श्री. चा. अ. दाभोलकर) | .... | २–०–० |

अनुक्रमणिका